# नवभारत

ऑगस्ट - २०१६

- महानुभावांचे चरित्रलेखन : स्वरूप आणि समीक्षा
- सेक्स, धर्म, गुलामगिरी आणि इस्लामिक स्टेट
- शेती, शेतकरी आणि शासन -- लेखांक - ५
- पुस्तक परीक्षण - न सांगण्याजोगी गोष्ट
- इस्लामची प्रथा व आधुनिकता
- जुने लेखन

अनुक्रमणिका











नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६९। अंक ११। ऑगस्ट २०१६
आषाढ/श्रावण शके १९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## ऑगस्ट २०१६

## अनुक्रमणिका

# महानुभावांचे चरित्रलेखन : स्वरूप आणि समीक्षा

अविनाश आवलगावकर

तेराव्या शतकातील मराठी वाङ्मयाच्या निर्मितीत महानुभाव संप्रदायाचा सिंहाचा वाटा आहे. पंथसंस्थापक सर्वज्ञ श्रीचक्रधरस्वामींचा जीवनग्रंथ असलेला 'लीळाचरित्र' हा ग्रंथ मराठी भाषेतील आद्यग्रंथ ठरला. पण त्याचबरोबर महानुभाव वाङ्मयाने मराठी साहित्यातील विविध वाङ्मयप्रवाहांना जन्म देऊन मराठी भाषा व साहित्याचा पाया तेराव्या शतकातच पक्का करून ठेवला. 'लीळाचरित्र' या आद्यग्रंथानंतर 'श्रीगोविंदप्रभुचरित्र', 'श्रीकृष्णचरित्र', 'श्रीदत्तात्रेयप्रभुचरित्र', 'श्रीचक्रपाणीचरित्र', पंथाचे पहिले आचार्य असणा-या श्रीनागदेवाचार्यांचे चरित्र असणारा 'स्मृतिस्थळ', त्यानंतरचा चरित्रात्मक इतिहास सांगणारा 'वृद्धाचार', 'अन्वयस्थळे', स्वामींची दैनंदिन त्रिकालपूजा सांगणारा बाइदेवबासांचा 'पूजावसर', यांबरोबर तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने महत्त्वाचे असणारे 'सूत्रपाठ', 'दृष्टान्तपाठ', 'स्थानपोथी', 'हेतुस्थळ', 'चरित्रअबाब', 'इतिहासप्रकरण' इत्यादी गद्यग्रंथनिर्मिती महानुभावांनी केली आहे. यात चरित्रवाङ्मयाबरोबरच इतिहास आणि तत्त्वज्ञानावरील भाष्य-महाभाष्यांचाही समावेश आहे.

गद्यनिर्मितीबरोबरच महानुभावांनी केलेली काव्यनिर्मितीही विपुल आहे. काव्य हा तर मध्ययुगातील सर्वच धर्मसंप्रदायांच्या साहित्यनिर्मितीचा पाया होता. परंतु महानुभावांची काव्यनिर्मिती वैविध्यपूर्ण आहे. महदंबेचे 'धवळे' हे मराठी साहित्यसृष्टीतील पहिले काव्यबिंबायन ठरले. त्यानंतर पंधराव्या-सोळाव्या शतकापर्यंत महानुभावांची काव्यनिर्मिती अखंडपणे होत राहिली. त्यात आख्यानकाव्य, स्थलवर्णनपर काव्ये, मूर्तिवर्णनपर काव्ये, तत्त्वज्ञानापर काव्ये इत्यादी प्रबंधकाव्यप्रकारांबरोबरच चौपद्या, पदे, धुवे (धावा), स्तोत्रे, आरत्या इत्यादी स्फुट काव्यरचनांचाही समावेश होतो.

महानुभावांची साहित्यनिर्मिती अशी विविधांगी आहे. या साहित्याचा अभ्यास केल्यानंतरच ख-या अर्थाने त्यातील विविधता लक्षात येऊ शकते. या साहित्याने मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे दालन ख-या अर्थाने समृद्ध केले. मराठी वाङ्मयाच्या इतिहासातील महानुभाव साहित्याचे हे वेगळेपण इतक्या शतकांनंतरही मराठीचा वारसा सांगणा-या महाराष्ट्राने लक्षात घेतले नाही, याची नोंद करावीशी वाटते. द्वैतवादी तत्त्वज्ञान सांगणा-या महानुभावपंथाने मराठी भाषेचा जो गौरव केला, त्याकडे खरेतर कोणत्याही मराठी भाषेला धर्मभाषेचे स्थान देऊन मराठी माणसाला पाठ फिरवणे शक्य होणार नाही. मुळात गुजराथी असलेले या संप्रदायाचे प्रवर्तक सर्वज्ञ श्रीचक्रधरस्वामी मराठी अनिवार बोलायचे. मराठी भाषेविषयी सर्वज्ञांना असणारी आत्मीयता 'लीळाचरित्रा'तून सहजपणे जाणवते. त्यांनी आपले सर्व तत्त्वज्ञान मराठी भाषेतून सांगितल्यामुळे, जनसामान्यांची भाषा म्हणून ओळखल्या जाणा-या मराठी भाषेचा वारसा सांगणा-या कोणत्याही मराठी भाषेला प्रथमच धर्मभाषेचे सिंहासन प्राप्त झाले. मराठी भाषेचा वारसा सांगणा-या कोणत्याही मराठी भाषकाला हे नाकारता येणार नाही.

निवृत्तिवादी असलेल्या या संप्रदायाची ही विशाल साहित्यनिर्मिती कोणत्या प्रेरणेतून झाली, याचा विचार हा या निबंधलेखनाचा हेतू आहे. महानुभावांच्या या साहित्यनिर्मितीमागे 'लीळाचरित्र' या आद्यग्रंथाचा आदर्श आहे. विविध वाङ्मयप्रकारांना जन्म देणा-या महानुभावांच्या दृष्टीनेही चरित्रवाङ्मयप्रकाराचे आदर्शरूप असणारे 'लीळाचरित्र'च इतर सर्व वाङ्मयाचे प्रेरणास्रोत ठरले आहे. त्यामुळे 'लीळाचरित्रा'च्या निर्मितीमागील प्रेरणांचा शोध हाच महानुभावांच्या इतर चरित्रवाङ्मयाच्या प्रेरणा स्पष्ट करणारा ठरेल.

श्रीचक्रधरस्वामींच्या उत्तरापंथे गमनाने त्यांचा सर्व परिवार मानसिक दृष्टीने अस्थिर झाला होता. सर्व

अनुक्रमणिका

परिवाराची धुरा ज्यांच्याकडे सोपविली होती, ते भटोबासही 'श्रीचक्रधरू द्या ओ' म्हणून भिक्षा मागू लागले होते. अशा अवस्थेत सर्वज्ञांच्या आठवणींशिवाय त्यांच्याजवळ दुसरे काहीच नव्हते. सर्वज्ञांनी सांगितल्याप्रमाणे सर्व परिवार श्रीगोंविदप्रभूंच्या सन्निधानी रिद्धपूर येथे येऊन राहिला असला, तरी सर्वज्ञांचा विरह त्या सर्वांनाच पोळणारा होता. त्यातही भटोबासांची अस्वस्थता ती आणखीच. श्रीप्रभूंचे सेवादास्य आटोपल्यावर ते एकांतात बसून सर्वज्ञांचे स्मरण करायचे. त्यांची ही विरही अवस्था लक्षात घेऊन म्हाइंभट त्यांना म्हणाले, "हा भटो तुम्ही निरंतरू काइसेयाचे मनन करीतुसा : तुम्हासि केवळाही मननावेगळा न देखो :" त्यावर भटोबास उर्फ नागदेवाचार्य म्हणाले, "मज सर्वज्ञें हिरवळीयेहूनि ऋद्धिपुरा पाठविले : ते माते सर्वज्ञ शास्त्र : पदार्थाज्ञान : तेआते श्रवण मनन निदिध्यासन करिजे : तेहि एकु स्मरणचि कीं गा : येथिची चरित्रे आठविजेति : आइकिजेति : उच्चारजेति : तेंही एकु स्मरणचि कीं गा : ऐसे सर्वज्ञे मज निरूपिले:" असे नागदेवाचार्यांनी आपल्या मनोवस्थेबरोबरच स्मरणभक्तीबद्दलही म्हाइंभटांना सांगितले. त्यावर नागदेवाचार्य आणि म्हाइंभट यांच्यात झालेला संवाद महत्त्वाचा आहे. तो असा–

"भटो तुम्हासी सर्वज्ञांचां वरू भणोन सर्वज्ञें जें निरूपलें ज्ञान शास्त्र आणि सर्वज्ञें जिआ केलीया लीळा सांघतैलिआ तुम्हांसि आठवताति : तर आतां आम्हासि असन्नधानी काइ : पुढा जो सर्वज्ञाचा मार्ग होईल : ते आंतवं एतुकें शास्त्र न धरे : तंवं सर्वज्ञाचिया लीळा तुम्ही सांघा मी लिहीन : भटीं भणतलें : हो कां : लिहिले तर मार्गासि उपयोगा जाइल : भणोंन हें नीकें विचारलें : माहिंभटो तरि आतां तुम्ही लिहां मी सांघताएं :" आणि अशा प्रकारे महानुभावांच्या चरित्रलेखनाचा प्रारंभ झाला. म्हाइंभटांनी सुरुवात केलेल्या या चरित्रलेखनाचा तपशील महानुभावांच्या 'इतिहास प्रकरणां'त अतिशय सुंदर रीतीने वर्णन केलेला आहे. तो मुळातूनच पाहू या; म्हणजे महानुभावांच्या या पहिल्या चरित्रग्रंथाची म्हणजेच 'लीळाचरित्र' निर्मितीची प्रक्रिया कशी घडली, ते कळेल. इतिहास प्रकरणातील वर्णन असे–

"मग माहिंभटी लेखन आरंभिले : भट माहिंभट वाजेश्वरी ऋद्धिपुरी विजनु करिती : एकु प्रहेर लेखनु करीति : नगरांतु दोघै भिक्षा करीति : बरवे करीति : उरलेनि काळे श्रीप्रभूचे सेवादास्य करीति : ऐसें आवर्घी भटीं लीळाकथनु केलें : ते म्हाइंभटी सा मासां लिहिलें : मग भटी भणतलें : माहिंभटो : जे मी सर्वज्ञासी अनुसरला नाही : तै जे लीळावर्तलीया तिया जेआंचिया अनुभवीचिआं तेआं तेआंते पुसांविआ : जानोचिया अनुभविचिया जानोतें पुसाविया : नाथोचिया अनुभवाचिआ नाथोतें पुसाविया : येल्होचिआ अनुभविचिआ येल्होतें पुसाविआ : ऐसेआचि परि जेआं जेआचिये अनुभविचिया तेआं तेआचिया पुसाविया : ऐसें भटीं माहिंभटाते भणतले : मग श्रीप्रभूंचां सन्निधानी जें जें भक्त होते तिआचिया अनुभवीया लीळा म्हाइंभटी तेआते पुसोनि लिहिलिया :"

याप्रमाणे आचार्यांनी त्यांच्या आठवणीच्या लीळा सांगितल्यावर परिवारातील इतरांकडूनही म्हाइंभटांनी लीळा गोळा केल्या. म्हणजे सन्निधानीच्या परिवाराकडून लीळा गोळा करण्याचे काम रिद्धपूरलाच झाले. साधारणतः लीळाचरित्राच्या उत्तरार्धाच्या लीळा म्हाइंभटांना आधी प्राप्त झाल्या. परंतु त्यानंतर आचार्यांच्या परवानगीनेच खेइभटांकडे, सारंगपंडितांकडे जाऊन त्यांना लीळा गोळा कराव्या लागल्या. लीळाचरित्राच्या निर्मितीसाठी म्हाइंभटांना प्रचंड परिश्रम करावे लागले. स्मृतिस्थळात त्याचा इतिहास वाचायला मिळतो. या सर्व लीळा संग्रहित केल्यानंतर अधिकाराने ज्येष्ठ नि श्रेष्ठ असलेल्या नागदेवाचार्यांपुढे त्या वाचून दाखविण्यात आल्या. सर्व लीळा माझ्याकडून तपासून घ्याव्या, असे म्हाइंभटांना आधीच आचार्यांनी सांगितले होते. त्याप्रमाणे आचार्यांनी लीळांचे शुद्धीकरण केले. "सर्वज्ञांचिये श्रीमुखीचे शब्द होति : हे नव्हेति : मग भटातें पुसौ पुसौ जे श्रीमुखीचे नव्हे ते मोडिले : येर भटाचेनि संवादें अन्वयी लाविले :" अशा रीतीने म्हाइंभटांनी गोळा केलेल्या लीळांना नागदेवाचार्यांनी संस्कारित केल्यावर 'लीळाचरित्र' या मराठीतील आद्य चरित्रग्रंथास अधिकृत 'लीळाचरित्र' म्हणून मान्यता मिळाली.

चरित्रलेखनाबरोबरच संशोधनाचा पहिला पाठही

महानुभावांनीच गिरवला. स्मरणभक्ती हा भक्तीचा एक चांगला मार्ग असून सर्वज्ञांनी तो आपल्या भक्तांना सांगितला होता. "हें जैसे देखिलें तैसे आठविजे:" असे स्वामींचे सूत्रच आहे. या स्मरणशक्तीच्या आदर्श रूपातूनच महानुभावांचे 'लीळाचरित्र' निर्माण झाले. यादवकालीन धर्मव्यवस्था आणि साहित्यनिर्मितीचा विचार करता धर्मप्रचार हा तत्कालीन साहित्यनिर्मितीमागचा मूळ हेतू असल्याचे दिसून येते. संत ज्ञानेश्वरांची 'ज्ञानेश्वरी' किंवा संत नामदेवांच्या पंजाबातील कार्याचा आढावा घेतला, तरी याची सत्यता पटेल. परंतु महानुभाव साहित्यनिर्मिती-मागे मात्र धर्मप्रचाराची कोणतीही प्रेरणा नव्हती. इंद्रभटांना श्रीप्रभूंच्या व आपल्या संबंधाने पवित्र झालेले वस्त्र देताना, आणि सर्वज्ञांनी उत्तरापंथे बीजे केल्यावर आम्ही काय करायचे या महदाइसांच्या प्रश्नाला उत्तर देतांना स्वामींनी 'हे देखिलें तैसें आठविजे' हे समरणभक्तीचे सूत्र सांगितले. महानुभावांच्या इतर अवतारांच्या चरित्रग्रंथांच्या निर्मितीमागेही हेच सूत्र उभे आहे. म्हणून तर म्हाइंभटांनी लीळांचे संकलन केल्यावर आचार्यांनी प्रत्येक लीळा तपासून घेतली. त्याला याच सूत्राचा आधार आहे. परमेश्वराच्या चरित्रात कोणत्याही प्रकारचे असत्य लिहिले जाता कामा नये, या श्रद्धेतूनच प्रस्तुत चरित्रग्रंथांचे सत्यरूप सांभाळले गेले आहे. केवळ स्मरणभक्तीचीच प्रेरणा या चरित्रलेखनामागे असल्याचे स्पष्टपणे दिसून येते.

महानुभाव वाङ्मयाचे अभ्यासक व ज्येष्ठ संशोधक डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांच्या मते "या पंथाला आपला आचारविचार समाजापुढे नव्याने मांडावयाचा होता. अस्तित्वात असलेल्या संस्कृत ग्रंथांचा अनुवाद करून अथवा भावार्थ सांगून त्यांचे कार्य भागण्यासारखे नव्हते." त्यांच्या मते महानुभावांच्या चरित्रलेखनामागची ही प्रेरणा होती. म्हणून त्यांनी संस्कृत ग्रंथांचा अनुवाद अथवा त्यांचा भावार्थ सांगत बसण्याऐवजी चरित्रलेखन केले. वास्तविक महानुभावांना कोणत्याही समाजासमोर आपला आचारविचार मांडावयाचा नव्हता. आणि असेच होते तर मग त्यांनी आपले सर्व साहित्य सांकेतिक लिपीत बद्ध का केले? अर्थात लिपिबद्ध केल्यामुळे महानुभावांच्या साहित्याचा सत्यांश अधिक प्रमाणात टिकून राहिला. परंतु ते साहित्य सर्व समाजापर्यंत पोचू शकले नाही, आणि महानुभावांची ती भूमिकाही नव्हती, हे आत्तापर्यंतच्या विवेचनावरून सहजपणे लक्षात येते. एकदा कवीश्वरबास उर्फ भास्करभट्ट बोरीकर गंगेवर काही संस्कृत रचना वाचीत बसले होते. तेव्हा लोक त्यांच्याकडे आकर्षित व्हायला लागले. हळूहळू अवघे नगर आकर्षित झाले. नागदेवाचार्यांना हे कळाल्यावर ते कवीश्वरबासांना म्हणाले, "भटो : तुज जरि ऐसे व्यसन तरि मजपुढा श्रीभागवत : गीता म्हणा :" प्रचार करणे, आपला आचारविचार समाजापुढे मांडणे हीच भूमिका असती, तर आपल्या रसवंती वाणीने लोकांना आकर्षित करणाऱ्या कवीश्वरबासांना नागदेवाचार्यांनी अशी मनाई का केली असती? चरित्रग्रंथांची निर्मिती ही कोणताही धर्मप्रचार वा प्रसारासाठी झालेली नाही, तर ती सर्वज्ञांच्या आज्ञेप्रमाणे स्मरण करण्यासाठी पुढील परिवाराची केलेली व्यवस्था आहे, हेच त्यामागचे एकमेव असे सत्य आहे.

ईश्वरी अवतारांची चरित्रे हा श्रद्धेचा आणि विशेष म्हणजे स्मरणभक्तीचा भाग असल्याने त्यांची निर्मिती ही महानुभावांच्या दृष्टीने अधिक महत्त्वाची होती. म्हाइंभटांनी भक्तीच्या दृष्टीने पंथीयांवर व साहित्याच्या दृष्टीने अवघ्या मराठी भाषकांवर केलेले हे मोठेच उपकार म्हणावे लागतील. ईश्वरी अवतारांच्यानंतर आचार्यपदी असणारे श्रीनागदेवाचार्य हेच फक्त महानुभावांचे चरित्रविषय झालेले आहेत. 'स्मृतिस्थळ' हा त्यांचा चरित्रग्रंथ होय. प्राचीन मराठीतील चरित्रलेखनाचे अभ्यासक डॉ. वसंत बोरगावकर यांच्या मते असंख्य साधकांचे जीवनभरचे निदिध्यास चरित्रलेखनाचे विषय होऊ शकले नाहीत. ते लिहितात- "महानुभावपंथाची व्यक्तिकेंद्रितता ह्या निवडीच्या आड आली असावी. एरव्ही महदाइसा, बाइसा, आऊसा, साधे, दामोदरपंडित, केसोबास, भास्करभट्ट, ह्या लहानथोर व्यक्ती जर चरित्रविषय म्हणून निवडल्या जात्या, तर मराठी चरित्रलेखनाचे स्वरूप विलक्षण प्रभावी बनले असते, यात शंका नाही.' महानुभाव संप्रदायातील प्रत्येक व्यक्ती तेवढ्या क्षमतेची होती, यात शंकाच नाही. डॉ. बोरगावकरांनाही त्यांच्या कार्यकर्तृत्वाची जाणीव असल्याचे पाहून मला समाधान वाटले. त्यामुळे ते म्हणतात त्याप्रमाणे महानुभाव संप्रदायातील या संतांची

अनुक्रमणिका

चरित्रे लिहीली गेली असती, तर मराठी भाषेतील चरित्रलेखनाचे स्वरूप नक्कीच विलक्षण प्रभावी बनले असते. परंतु डॉ. बोरगावकर म्हणतात तशी व्यक्तिकेंद्रितता महानुभाव संप्रदायात नाही. महानुभाव-संप्रदाय हा ईश्वरकेंद्रित आहे, हे प्रारंभी लक्षात घेणे आवश्यक आहे.

महानुभावांनी ईश्वरी अवतारांची चरित्रे लिहिली ती स्मरणभक्तीसाठी; आणि आचार्यांचे चरित्र लिहिले ते केवळ पंथाचे पहिले आचार्य होते म्हणूनच नाही, तर त्यांना सर्वज्ञांचा वरदहस्त होता. त्यांच्या मुखातून निघणा-या शब्दांना ईश्वरवाणीचे मूल्य होते. सर्वज्ञांच्या आज्ञेनुसार भटोबासांनी केलेले प्रवचन ऐकून बाइसा म्हणाल्या "हां बाबा : ऐसें होए?" त्यावर सर्वज्ञ म्हणाले, "बाइ : हा कांही आपुलें बोलैल? हा एथिचेंचि बोलैल कीं :" हे सर्वज्ञांचे आचार्यांच्या संदर्भातील उद्‌गार आचार्यांचे संप्रदायातील स्थान निश्चित करणारे आहेत. म्हणूनच 'स्मृतिस्थळा' च्या माध्यमातून आचार्यांचे चरित्र लिहिले गेले. महानुभावांनी तत्त्वज्ञान आणि तत्त्वज्ञानाप्रमाणे आचरण यांवर अधिक भर दिला आहे. 'लीळाचरित्रा'त सर्वज्ञांनी सांगितलेले तत्त्वज्ञान आलेले आहे, तर स्मृतिस्थळात या तत्त्वज्ञानाप्रमाणे करावयाच्या आचरणाचा परिपाठ आहे. त्यामुळे पंथात 'स्मृतिस्थळा'चे महत्त्वही अनन्यसाधारण असेच आहे.

आचार्यांप्रमाणे इतर संतांची चरित्रे लिहिली गेली नसल्याने जणूकाही त्यांची उपेक्षा झाली असल्याचे चित्र डॉ. वसंत बोरगावकर यांनी रेखाटले आहे. यासंबंधी विवेचन करताना ते लिहितात, "जीवरूपाची उपेक्षा व त्याविषयीची अनासक्त वृत्ती ही किती कठोर असते, हे अनेक भक्तांनी अगतिकपणे, दुःखद अंतःकरणाने मृत्युसमयी विचारलेल्या" 'भटो! मज देवो होइल का?' यांसारख्या अनुत्तरित प्रश्नातून लक्षात येते." विशेष म्हणजे हा प्रश्न अनेक भक्तांनी नव्हे, तर फक्त म्हाइंभटांनीच त्यांच्या मृत्युसमयी आचार्यांना विचारला होता; आणि तो अनुत्तरित नव्हता. कारण आचार्यांनी लगेच त्याचे उत्तर दिले. ते म्हणाले, "तुम्हासी देवो होइलचि : तुम्हांसी जरि देवो नव्हे : तरि कव्हणाही नव्हे :" आचार्यांनी असे आत्मविश्वासपूर्वक उत्तर दिल्यावर म्हाइंभटांना देवोवाणीचा प्रत्यय आला. हा प्रश्न विचारण्यामागचा हेतूही हाच होता. "हां कांहीं आपुलें बोलैल? हा एथिचेंचि बोलैल की :" असे प्रशस्तिपत्र सर्वज्ञांनी आधीच आचार्यांना दिले होते. त्यामुळे "भटो तुमचेनी मुखे असास्त्र न निगे कीं" याची जाणीव म्हाइंभटांना होती. म्हणून मृत्युसमयी त्यांनी ही विचारणा करून जणू ईश्वराकडूनच वचन घेतले. मृत्युसमयीची त्यांची अगतिकता, आपल्या उद्धाराविषयीची तळमळ आणि आचार्यांवर असणारा दृढविश्वास हा त्रिवेणी संगम त्यांच्या प्रस्तुत प्रश्नात होता. त्याचे योग्य उत्तर मिळाल्यावर म्हाइंभटांनी सुखाने डोळे मिटले.

महानुभावपंथातील कोणतेही संत उपेक्षित नव्हते, किंवा त्यांच्या अनासक्त वृत्तीमुळे त्यांना कठोरतेचा प्रत्यय आल्याचे कोठेही पहावयास मिळत नाही. डॉ. बोरगावकरांनी हे कोठून शोधून काढले, ते कळत नाही. आणखी एक महत्त्वाचे म्हणजे "महानुभाव चरित्रकारांचे लक्ष यादववंशातील राजांकडे चरित्रलेखनाच्या दृष्टीने वळू शकलेले नाही, हीही गोष्ट नमूद करता येईल." असे डॉ. बोरगावकर लिहितात. यादववंशातील राजांचे चरित्र महानुभावांनी लिहिण्याचा प्रश्नच कोठे निर्माण होतो? महानुभावसंतांना जर चरित्रलेखक म्हणून प्रसिद्धी मिळवायची होती, तर ते यादववंशातील राजांची चरित्रे लिहीत बसले असते? डॉ. वसंत बोरगावकरांची ही भूमिकाच निरर्थक आहे. 'हे देखिले तैसे आठविजे' या सूत्रानुत्रार स्मरणभक्तीसाठी ईश्वरी अवतारांची चरित्रे लिहिली असतील, तर यादववंशातील राजांची चरित्रे लिहून महानुभावांना काय राजांची भक्ती करावयाची होती का? 'स्मृतिस्थळ' या चरित्रग्रंथाच्या निर्मितीमागील प्रेरणांचा शोधही उपरोक्त विवेचनात घेतलेला आहेच. त्यात यादववंशातील राजांच्या चरित्रलेखनाचा प्रश्नच कोठे येतो? या सर्व भूमिकेचा विचार करता डॉ. वसंत बोरगावकरांना महानुभावांच्या चरित्रलेखनाची प्रेरणाच कळाली नव्हती की काय, असा प्रश्न पडतो. तेव्हा 'हे देखिलें तैसें आठविजे' या एकाच सूत्रात महानुभावांच्या ईश्वरी अवतारांच्या चरित्रलेखनाची प्रेरणा दडलेली असल्याचे स्पष्ट होते.

महानुभावपंथावर आणि संबंध मराठी भाषकांवर







अनुक्रमणिका

म्हाइंभटांचे थोर उपकार आहेत. पंथावर या दृष्टीने की सर्वज्ञांच्या लीळा बांधल्या नसत्या, तर पुढच्या पिढीला ईश्वराचे स्मरण कसे करता आले असते? 'स्मृतिस्थळा'-मध्ये नागदेवाचार्य म्हणतात, "तीर्था जाइजे तेथचीया लीळा आठविजति : तेथ ते स्मरण" स्मरण म्हणजे ईश्वराच्या लीळा आठवणे. चांगदेवभट उर्फ बटिका आईला भेटायला गावी निघाले तेव्हा स्वामी त्यांना म्हणाले, की जा पण मला विसरू नको "एक दोनि वेळ त-र्ही आठवीजे हो : परि वींझू दीसु जाओं नेदिज :" अशी त्यांना स्मरणाची जाणीव करून दिली. म्हाइंभटांनी लीळा बांधल्या नसत्या, तर मात्र अनेक प्रश्न निर्माण झाले असते.

दुसरे महत्त्वाचे म्हणजे लीळाचरित्राच्या रूपाने मराठी गद्यलेखनाचे अनेक मापदंड निर्माण करणारी एक साहित्यकृती निर्माण झाली. लीळाचरित्रापूर्वी चरित्रलेखनाचीच नव्हे, तर कोणत्याच लेखननिर्मितीची परंपरा मराठी भाषेला नव्हती. त्यामुळे 'लीळाचरित्र' हाच मराठीतील लेखनपरंपरेचा बीजग्रंथ ठरला. सर्वज्ञांच्या लीळा लिहिणे हा हेतू असला, तरी या ग्रंथाने तत्कालीन सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाचाही एक आलेख निर्माण केला आहे. श्रीचक्रधरस्वामींचे व्यक्तिमत्व अलौकिक होते, आणि तरीही घडणारी प्रत्येक लीळा लौकिक जीवनाशी संबंधित होती. भक्तांना अलौकिक तत्त्वज्ञान सांगणा-या सर्वज्ञांचा वावर मात्र सर्वसामान्य माणसासारखा होता. म्हाइंभटांनी त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील लौकिक आणि अलौकिक अशा दोन्ही बाजू लक्षात घेतल्या आहेत. पुत्र, राजकुमार, पती, मित्र आणि सर्वज्ञ अशा विविध रूपांत एकाच लीळाचरित्रात स्वामींचा वावर आहे.

एकांक, पूर्वार्ध आणि उत्तरार्ध अशा तीन भागांत लीळाचरित्राची बांधणी असली, तरी तिन्ही भागांचे मिळूनच संपूर्ण 'लीळाचरित्र' आहे. बांधणीच्या दृष्टीने त्याचे तीन भाग मानण्यात आलेत. वास्तविक गुजरातमधून महाराष्ट्रात आल्यापासून तो मेहकर, पैठण येथे बोणेबाई, बाइसा यांची भेट होईपर्यंतचा सर्वज्ञांचा प्रवास हा एकाकी असल्याने या सर्व लीळांचा समावेश एकांकाच्या लीळांमध्ये होतो. बोणेबाई, बाइसा यांच्या भेटीपासून तो नागदेवाचार्यांचे अनुसरण होईपर्यंतच्या लीळांचा समावेश पूर्वार्धात होतो, तर नागदेवाचार्यांच्या अनुसरण्यापासून स्वामींच्या उत्तरापंथे गमनापर्यंतच्या सर्व लीळांचा समावेश उत्तरार्धात होतो. मात्र या त्रिखंडात्मक चरित्रग्रंथाची निर्मिती उलट्या क्रमाने झाली आहे. कारण नागदेवाचार्यांच्या काळातील लीळा ताज्या असल्याने, त्या परिवाराकडूनच मिळाल्या. प्रामुख्याने त्या नागदेवाचार्यांनाच माहीत होत्या. ते म्हणतात "भणौनि मी जै लागौनि अनूसरला जै लागौनि मज देखता जीया : सर्वज्ञाचिया लीळा वर्तलीया : तिया मी आवांकीतेंचि असे :....." पूर्वार्ध व एकांकातील लीळांसाठी म्हाइंभटांना भटकंती करावी लागली. एकांकातील बहुतांशी लीळा चर्चिक आणि जिज्ञासक म्हणून ख्याती असलेल्या महदाइसांकडून म्हाइंभटांना उपलब्ध झाल्या.

स्वरूप त्रिखंडात्मक असले, आणि ग्रंथाची निर्मिती उलट्या क्रमाने झाली असली, तरी सबंध ग्रंथ मात्र एकसंध आहे. सर्वज्ञांच्या कार्याचा एक सलग इतिहासच यातून सिद्ध झालेला आहे. यातील प्रत्येक लीळा सर्वज्ञांच्या ज्ञात आणि अज्ञात कृतीची साक्षीदार आहे. म्हणून प्रत्येक लीळाच चिंतनीय आहे. डॉ. व. दि. कुलकर्णी म्हणतात त्यापमाणे " 'लीळाचरित्र' म्हणजे केवळ परमेश्वराची नामभक्ती नाही, तर ते परमेश्वराच्या मानवी अवतारातील प्रत्येक क्षणाच्या लीळेचे भक्तिभावाने केलेले समरण आहे."

विशेष म्हणजे यातील प्रत्येक लीळा स्वतंत्र आहे. म्हाइंभटांनी त्या अनेकांकडून प्राप्त केलेल्या असल्याने व्यक्तिगणिक त्याची निवेदनशैली, भाषा, वाक्यरचना यांत फरक पडणे स्वाभाविक होते; परंतु लीळाचरित्रात तसे कोठेही होत नाही. त्यामुळे प्रत्येक लीळा स्वतंत्र असूनही, ती सबंध लीळाचरित्राचा एक महत्त्वाचा घटक असते. एक-एक-लीळा वाचतवाचतच एक बृहत् कादंबरी वाचल्याची अनुभूती वाचकांना येते. कारण एकहाती लेखनाप्रमाणे सबंध लीळाचरित्राची निर्मिती झालेली आहे. म्हाइंभटांच्या या लेखनकौशल्याला नक्कीच दाद द्यायला हवी. वास्तविक सर्वज्ञांचे व्यक्तिमत्त्व चित्रित करणे अवघड आहे. कारण लौकिक रूपात आपल्यासमोर उभ्या असणा-या या व्यक्तिमत्त्वाला अलौकिकत्वाची एक दुसरी बाजू आहे. म्हणजे लौकिकाच्या पलीकडे

असणारे हे अलौकिक व्यक्तिमत्त्व आहे. सर्वज्ञांच्या व्यक्तिमत्त्वाच्या या दोन्ही कडा आपल्या शब्दांत साकार करणे खरेतर खूपच अवघड आहे. त्यातही म्हाइभंट हे मूळचे संस्कृत पंडित. मराठी भाषा ही तत्कालीन जनसामान्यांची भाषा. जनसामान्यांच्या भाषेतून सर्वज्ञांचे असामान्य व्यक्तिमत्त्व शब्दबद्ध करणे म्हणजे मेरू पर्वताला कवेत घेण्यासारखे होते. परंतु म्हाइंभटांनी ते लीलया पेलवले. त्यासाठी त्यांनी आपली सर्व शक्ती पणाला लावली, यात शंका नाही. आणि म्हणूनच सर्वज्ञांचे लौकिकाबरोबरच अलौकिक व्यक्तिमत्त्वही वाचकांना गोचर होऊ लागले.

'लीळाचरित्रा'तील प्रत्येक लीळा एखादी लहानशी कथा असावी, तशी आहे. एखाद्या घटनेचे किंवा प्रसंगाचे कथन करावे, त्याप्रमाणे लीळाचरित्रातील प्रत्येक लीळेचे कथन केले जाते. परंतु या कथनाला कोणतीही तांत्रिक चौकट नाही. जशी घटना घडली तशीच सरळपणे ती सांगायची, हीच चौकट. साधीसोपी आणि तितकीच प्रभावी भाषा. कोठेही अलंकारांचा सोस नाही, की पांडित्याचा हव्यास नाही. प्रत्येक लीळेच्या मागे तत्त्वज्ञानाची एक बैठक असली, तरी भाषेला तत्त्वज्ञानाच्या गांभीर्याचे कवच नाही. श्रीमुखीची येणारी वचनेही तितकीच सोपी व अर्थपूर्ण. जीवनाची सर्वांगीण चिकित्सा करणारी. 'लीळाचरित्र' आणि 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' या दोन्ही चरित्रग्रंथांची निर्मिती करणा-या म्हाइंभटांनी या निर्मितीवर कलात्मकतेचे कोणतेही संस्कार घडवलेले नाहीत. म्हाइंभट नावाच्या भक्ताचा तो एक सहजसुंदर असा तत्त्वज्ञानाची डूब असलेला भक्तीचा आविष्कार आहे. त्यात आर्तता आहे, तशी ईश्वराच्या सर्वात्मक, सर्वव्यापी अशा ब्रह्मज्ञानाची अनुभूतीही आहे. असे असूनही चरित्रलेखन किती वास्तव व यथार्थ असावे, याचा महानुभावांचे चरित्रग्रंथ आदर्श ठरले आहेत. भक्तिभावना ही या चरित्रलेखनामागे केंद्रवर्ती असूनही प्रा. अ. म. जोशी म्हणतात त्याप्रमाणे, भाविकपणाचा अंश प्राचीन चरित्रात्मक लेखनात यथार्थ चरित्रकथनाच्या आड आलेला नाही.

अनेक वैशिष्ट्यांनी युक्त असलेल्या या चरित्रलेखनाने मराठी साहित्यात चरित्रलेखनाचा एक आदर्श उभा केला आहे. ईश्वराच्या लीळा नित्यदिनी आठवणे हा यामागील हेतू असूनही चरित्रलेखनाचे अनेक संकेत या ग्रंथांनी मराठी साहित्याला दिलेले आहेत. कोणतेही चरित्र हे व्यक्तीचे असले, तरी समष्टीची अनेक रूपे त्यात प्रतिबिंबित होत असतात. 'लीळाचरित्र', 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' या ग्रंथांतही तसे झाले आहे. ईश्वरीचे चरित्र असूनही सर्वज्ञांच्या परिवाराचेही चरित्र त्यातून आपोआपच प्रतिबिंबित होत जाते. श्रीगोविंदप्रभूंच्या तुलनेत श्रीचक्रधरस्वामींचे व्यक्तिमत्त्व अधिक व्यापक व अधिक समाजोन्मुख आहे. त्यामुळे समाजातील विविध घटकांचा, विविध वृत्ती-प्रवृत्तींचा समावेश 'लीळाचरित्रा'त अधिक व्यापक प्रमाणात झालेला दिसून येतो. 'लीळाचरित्रा'त सर्वज्ञ आणि भक्त यांच्यातील केवळ संवाद हासुद्धा एक स्वतंत्र अभ्यासाचा भाग आहे, इतका तो बहुआयामी आहे. सर्वज्ञांच्या या परिवारात लहान-थोर, जवळचे-दूरचे सन्निधानातील भक्त, स्वामींवर प्रेम करणारे, तसेच स्वामींचा द्वेष करणारे, एवढेच नव्हे, तर मानवेतर प्राण्यांचाही समावेश आहे. परंतु हे सर्व घटक सर्वज्ञांच्या व्यक्तिमत्त्वाने प्रभावित झालेले आहेत. एवढेच नव्हे, तर या चरित्रग्रंथांतून महाराष्ट्राची जी संस्कृती पहायला मिळते, त्यालाही कारणीभूत सर्वज्ञांचे व्यक्तिमत्त्वच आहे. महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास लिहिणे ही भूमिका नसतानाही, सर्वज्ञांचे बहुआयामी व्यक्तिमत्त्व आणि समाजातील सर्व स्तरांत त्यांचा असणारा वावर यातूनच हे सारे प्रस्तुत चरित्रलेखनाचे घटक बनले आहेत. पण हे सारे चितारताना लौकिकात राहूनही अलौकिक असणा-या सर्वज्ञांच्या व्यक्तिमत्त्वाला कोणतीही बाध्यता येणार नाही, याची पुरेपूर काळजी म्हाइंभटांनी घेतली आहे. एवढेच नव्हे, तर आपल्या स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंबही त्यात कसे पडणार नाही, याचीही त्यांनी अधिक काळजी घेतली आहे. म्हणूनच सबंध चरित्रात त्यांनी स्वतःचा उल्लेख 'म्हाइंभटी पुसिले', 'म्हाइंभटी म्हणीतले' असा तृतीयपुरुषी केलेला आहे. म्हाइंभटांची ही त्रयस्थ व तटस्थवृत्ती या चरित्रलेखनाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य ठरले आहे. प्रसंगचित्रण, कथाभागाला पूरक अशी संवादशैली, कथनात्मकशैली, वर्णनशैली, कथारूपातील वास्तवता, 'लीळाचरित्रां'तील सूत्ररचना, त्याच्या स्पष्टीकरणार्थ येणारे समर्पक दृष्टांत, ही सारी

वैशिष्ट्ये लीळाचरित्राचे वाङ्मयीन माहात्म्य सिद्ध करून जातात.

लेखनाची कोणतीही पूर्वपरंपरा नसताना सिद्ध झालेल्या मराठीतील या पहिल्या चरित्रग्रंथाने, पुढील निर्मितीसाठी मात्र लेखनदृष्टी दिलेली आहे. म्हाइंभटांच्याच कुंचल्यातून निर्माण झालेला 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' हा मराठीतील दुसरा चरित्रग्रंथ याचे द्योतक म्हणावे लागेल. त्यामुळे 'लीळाचरित्रा'तील अनेक वैशिष्ट्ये 'श्रीगोविंद-प्रभुचरित्रा'त दिसून येतात. दोन्हींची निर्मितिप्रेरणा एकच आहे आणि पद्धतीही तीच आहे. कारण "श्रीगाविंद-प्रभु बीजे केल्यानंतरे : म्हाइंभटीभटोबासांपासौनि-श्रीप्रभुचिआं लीळा लिहिलिया : भक्तीजनाचिआं अनुभ-विचिआं भक्तीजनापौनि लिहिलिया: जनाचिआं अनुभ-विचिआं जनासि पुसिलिया : तेआचिआं आदि केलिया : मग तेआ लीळा भटाचेनि मुखें समस्त गुरुकुळी घोकिलिया" सर्वज्ञही अधूनमधून आपल्या शिष्यांना श्रीप्रभूंच्या लीळा सांगत असत. "आन सर्वज्ञे द्वापरीचिया लीळा, श्रीदत्तात्रयप्रभुचिया लीळा : श्रीप्रभुलीळा भक्तीजनाप्रति प्रसंगे निरूपिलिया तिआही आठवितुचि असे" असा आचार्यांनीच म्हाइंभटांजवळ खुलासा केलेला आहे. यावरून आणखी एक गोष्ट स्पष्ट होते, की श्रीदत्तात्रेयप्रभू आणि इतर अविद्यमान अवतारांच्या लीळा श्रीचक्रधरस्वामींनीच निरूपिलेल्या आहेत. ऋद्धिपूरच्या बाहेर असताना ते आपल्या शिष्यांना श्रीप्रभूंच्या लीळा सांगत असत. विशेष म्हणजे म्हाइंभट सर्वज्ञांजवळ जरी अनुसरले असले, तरी ते श्रीप्रभूंच्या सेवेत ऋद्धिपूर येथेच रहात होते आणि म्हणूनच "म्हाइंभटांतें श्रीप्रभुगोसावियाचीया दास्या जो वेगळीक दाखवील : तयासी मी महावाक्य वाखाणीन" अशी आचार्यांनी पैज लावली होती. त्यामुळे 'लीळाचरित्राची' बांधणी करण्यासाठी म्हाइंभटांना जे परिश्रम करावे लागले तसे 'श्रीगोविंदप्रभुचरित्रा'ची बांधणी करताना करावे लागले नाहीत, असे यावरून दिसून येते.

'लीळाचरित्र' व 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' या दोन्ही चरित्रग्रंथांची निर्मितिप्रेरणा व लेखनस्वरूप सारखे असले, तरी अनेक दृष्टींनी त्यांत फरकही आहे. भौगोलिक दृष्टीने जरी विचार केला, तरी दोन्हींचे वेगळेपण चटकन लक्षात येईल. सर्वज्ञांचा विहार गुजरात, महाराष्ट्र, आंध्रप्रदेश, मध्यप्रदेश या प्रांतांत झालेला असल्याने लीळाचरित्राची व्याप्ती आपोआपच वाढत गेली. त्यामुळे या विविध प्रांतांतील संस्कृती व भाषांचे अनेक संदर्भ लीळाचरित्रात पहायला मिळतात. 'श्रीगोविंदप्रभुचरित्रा'ची व्याप्ती विदर्भातील ऋद्धिपूर आणि त्या आजूबाजूचा परिसर एवढ्यापुरतीच मर्यादित आहे. कारण श्रीप्रभूंचा वावर या परिसराबाहेर नव्हताच. त्यामुळे या चरित्रग्रंथातून व-हाडबोली व व-हाडी संस्कृतीचे अनेक संदर्भ पहायला मिळतात.

मुळात 'लीळाचरित्रा'तील श्रीचक्रधरांचे व्यक्तित्वच बहुआयामी आहे. सर्वसामान्यांच्या जीवनातील लौकिक व्यक्तिमत्त्वानुसार त्यांच्या जीवनातील अनेक पैलू तर प्रगट होतातच; परंतु अलौकिक असणा-या त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शनही लीळाचरित्रात होते. अत्यंत देखण्या असणा-या सर्वज्ञांच्या व्यक्तिमत्त्वाची एक तत्त्ववेत्ता म्हणून पटणारी ओळख ही 'लीळाचरित्रा'ची खरी श्रीमंती ठरते. त्यामुळे सर्वज्ञांचे बहुआयामी, सर्वव्यापी असे व्यक्तिमत्त्व वाचकांच्या मनाचा ठाव घेते. याउलट, श्रीप्रभूंच्या व्यक्तिमत्त्वाला लौकिक अर्थाने अनेक मर्यादा आहेत. 'श्रीप्रभू ते निर्गुण ब्रह्म' या सर्वज्ञांच्या उक्तीचा 'श्रीगोविंदप्रभुचरित्रा'त सातत्याने प्रत्यय येत असला, तरी सर्वज्ञांसारखे हे व्यक्तिमत्त्व बहुआयामी नाही. 'श्रीगोविंदप्रभुचरित्रा'त उक्तिरूप नव्हे, तर कृतिरूप तत्त्वज्ञान आपल्याला पहायला मिळते. श्रीगोविंदप्रभूंचा अवतारच मुळी दवडण्याचा अवतार असल्याने दवडलेल्या (घालवलेल्या) जिवाचे सर्व देहधर्म त्यांनी स्वीकारले होते. म्हणून हे व्यक्तिमत्त्वच विलक्षण होते. अर्थात 'राउळ वेडे : राउळ पिसे' असे वरकरणी दिसणा-या श्रीप्रभूंच्या व्यक्तिमत्त्वातच 'राउळ माए : राउळ बापु :' या उक्तीचा सातत्याने प्रत्यय येतो.

म्हाइंभटांनी मात्र या दोन्ही व्यक्तिमत्त्वांचा एक सुंदर आलेख त्या त्या चरित्रग्रंथात काढलेला आहे. 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' लीळासंख्येने कमी असले, तरी त्यातून एका विलक्षण अलौकिक व्यक्तिमत्त्वाची लौकिक पातळीवर होणारी ओळख हेच त्याचे महत्त्वाचे वैशिष्ट्य ठरते. व-हाडी बोलीचा 'श्रीगोविंदप्रभुचरित्रा'त झालेला

वापर सोडला, तर कथनशैली, संवादशैली, वर्णनशैली इत्यादींबरोबरच वास्तवता, चरित्रलेखनामागील आत्मीयता ही सारीच वैशिष्ट्ये समान असल्याचे स्पष्ट होते.

'श्रीकृष्णचरित्र', 'श्रीदत्तात्रेयचरित्र' आणि 'श्रीचक्रपाणिचरित्र' या चरित्रग्रंथांच्या संदर्भातही हेच दिसून येते. विशेष म्हणजे या तीनही अवतारांच्या लीळा सर्वत्र श्रीचक्रधरांनी जिज्ञासक असणा-या महदाइसांना व इतर भक्तांना वेळोवेळी सांगितलेल्या आहेत. त्यामुळे त्यांचा समावेश 'लीळाचरित्र' ग्रंथातच आहे. पुढे यातील 'श्रीकृष्णचरित्र'पर लीळांचे पिढीपाठ, तळेगावकरपाठ व वाइंदेशकर पाठ असे तीन पाठ तयार झालेत. पिढीपाठ हा म्हाइंभटांचा असल्याने अर्थातच संप्रदायात त्याला अधिक महत्त्व आहे. त्यामुळे अठ्ठेचाळीस लीळा असलेला पिढीपाठ हा इतर पाठांपेक्षा नक्कीच महत्त्वाचा ठरला. अर्थात मूळ 'लीळाचरित्राती'ल श्रीकृष्णविषयक लीळा वेगळ्या काढून 'श्रीचक्रधरनिरूपित श्रीकृष्णचरित्र' असा स्वतंत्र चरित्रग्रंथ तयार झाला. परंतु या चरित्राचा मूळ 'लीळाचरित्रा'तच समावेश असल्याने तो लीळाचरित्राचाच एक भाग म्हणायला हरकत नाही. किंवा इतर दोन्ही चरित्रग्रंथांचाही समावेश 'लीळा-चरित्रा'तच आहे. त्यामुळे या चरित्रग्रंथांचा स्वतंत्रपणे विचार करण्याची गरज नाही. ही सर्वच चरित्रे ओथंबलेल्या अंतःकरणाचा परिपाक असल्याने ती बोलीभाषेच्या सहजसौंदर्याने नटलेली आहेत. म्हणून या चरित्रग्रंथात कोठेही कृत्रिमता आढळत नाही. महानुभावांच्या चरित्रलेखनाचा आणखी एक विशेष म्हणजे यांतील प्रत्येक लीळा ही स्मृतिरूप असल्यामुळे, या सर्व आठवणींचे कथन गोष्टीरूपाने करण्यात आलेले आहे. प्रत्येक लीळा एक गोष्ट वाटावी, इतकी ती रसभरीत आहे. लीळा वाचताना म्हाइंभट जणूकाही एक एक कहाणी सांगत असल्याची जाणीव वाचकांना होते. म्हणूनच या चरित्रग्रंथांचा कथाप्रधान साहित्य म्हणून विचार करावा लागतो. चरित्रग्रंथात आलेल्या ह्या लीळा कथाप्रधान असल्याचे महानुभाव पंडितांनीसुद्धा मान्य केले आहे. 'लक्षणरत्नाकरा' वरील बत्तीसलक्षणी टीपेत लीळावाक्याचे स्पष्टीकरण देताना टीपकार लिहितात-

"जेथ गोष्टी, मात, कथा, वार्ता आणि आख्यायिका तें लीलावाक्य बोलिजे : अज्ञाननिवृत्तीलागी की संदेहनिवृत्तीलागी जो वृत्तांतु सांगिजे ते गोष्टि : यथा कामाख्या निमितें पुरत्यागु : आश्चर्यकारक जे गोष्टी भविष्यरूप ते मात बोलिजे : .......एवं आदि द्वापराचिया अथवा आपुल्या मागिलिया एकांकाचिया : लीळा सांघितलीया : तीया कथा : भक्ताला विद्यमान जें वर्तले तया वार्ता......पुराणव्यतिरिक्त कथारूप गोष्टी ते आख्यायिका : यथा : धानाइसाप्रति काऊळिया साळेची :"

गोष्टी, मात, कथा, वार्ता आणि आख्यायिका अशा पाच घटकांचा अंतर्भाव लीळेत होतो, असे टीपकार सांगतात. या पाचही घटकांच्या स्वरूपवर्णनात कथात्मकता हा विशेष समान असल्याने टीपकारांच्या अभिप्रायावरून लक्षात येते. महानुभावांच्या चरित्रलेखनातील प्रत्येक लीळा या घटकांचा समावेश असणारी आहे. म्हणजे चरित्रपर असणा-या लेखनानेच मराठीतील कथात्मक साहित्य-लेखनालाही प्रारंभ झाला, असे म्हणता येईल. विशेष म्हणजे सूत्रांच्या स्पष्टीकरणार्थ स्वतः सर्वज्ञांनीच विविध दृष्टान्त दिलेले आहेत. या दृष्टान्तांचा समावेश कथा-साहित्यातच होतो. स्मरणभक्तीच्या प्रेरणेतून निर्माण झालेल्या या चरित्रग्रंथांनी अनेक वैशिष्ट्यांमुळे मराठी वाङ्मयाच्या इतिहासात आपले स्वतंत्र असे अनन्य-साधारण स्थान निर्माण केले आहे. ✷✷✷

अनुक्रमणिका

# सेक्स, धर्म, गुलामगिरी आणि इस्लामिक स्टेट

मुकुल रणभोर

**प्रस्तावना :**

Sex विषयी भारतीयांची मानसिकता अजून बदलण्याची गरज आहे, याविषयी भारतात मोकळेपणाने अजूनही सार्वजनिक ठिकाणी बोलले जात नाही. Sex प्रमाणे ISIS या विषयावर भारतात आणि मुख्यतः महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनात उदासीनता आहे. (उदा., प्रा. शेषराव मोरे, निळू दामले, अतुल कहते आणि योगेश परळे या चारच जणांनी मराठीमध्ये काही अभ्यास करून इस्लामिक स्टेटबद्दल लिहिले आहे. बाकी रोजच्या वृत्तपत्रांमध्ये बातमीशिवाय इस्लामिक स्टेटबद्दल फारसं काही येतच नाही.) या दोन विषयांवर महाराष्ट्रात अजिबात चर्चा होत नाही. तिसरा विषय आहे गुलामगिरीचा. महाराष्ट्रातील प्रबोधनाच्या परंपरेमुळे सर्व प्रकारांची 'गुलामगिरी' महाराष्ट्रातून बहुतेक हद्दपार झाली आहे. 'माणसाचा संपत्ती म्हणून वापर' ही कल्पना भारतात कधीच अस्तित्वात नव्हती. ती पश्चिमी देशांमध्ये होती. त्या संपत्तीचा शरीरसुखासाठी उपयोगसुद्धा पश्चिमी देशांत केला जात असे. भारतात 'जातिव्यवस्था' हेच गुलामगिरीचे स्वरूप होते. पण प्रबोधनाच्या मोठ्या परंपरेनंतर आज कोणीही मराठी माणूस गुलामगिरीची जाहीर भाषा बोलणार नाही. याचा अर्थ महाराष्ट्राच्या सावजनिक जीवनातून Sex, इस्लामिक स्टेट आणि गुलामगिरी हे तिन्हीही विषय बहिष्कृत आहेत. आणि या तिन्हीही गोष्टी हातात हात घालून एकत्र उच्छाद मांडू लागल्या, आणि त्याला जागतिक प्रतिष्ठासुद्धा मिळू लागली. इस्लामिक स्टेट, Sex, गुलामगिरी आणि धर्म हे सर्व एकत्र येऊन मध्यपूर्वेत अत्याचार होत आहेत. इस्लामिक स्टेटने कुराणातील आयतींचा संदर्भ सांगत 'Sex गुलामी' हा दहशतवादाचा एक नवीन मार्ग तयार केला. इस्लामिक स्टेटने सुरू केलेल्या या नवीन व्यवस्थेचा अभ्यास करणे आवश्यक आहे. मराठीमध्ये कोणीही या विषयावर लिहिलेले नाही.

**साधने :**

साधारणपणे संदर्भ साहित्य शेवटी लिहावे, असा संकेत आहे. परंतु ज्यांच्याबरून हा अभ्यास करता आला आहे, त्या संदर्भांची पार्श्वभूमी माहित असणे आवश्यक आहे. म्हणून सुरुवातीला संदर्भसाहित्य.

इस्लामिक स्टेटला आपलं म्हणणं जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोचलेलं हवं आहे. म्हणून उपलब्ध सर्व माध्यमांचा ते योग्य वापर करत आहेत. इस्लामिक स्टेट 'दिबाक'या नावाचे एक मासिक प्रकाशित करते. त्याचे १२ पेक्षा अधिक अंक प्रकाशित झाले आहेत. 'दिबाक' हे उत्तर सिरीयामधील एक शहर आहे. मुसलमानांची अशी एक श्रद्धा, कुराणानुसार तयार झालेली आहे की, मुसलमान विरुद्ध बिगर मुसलमान हा जागतिक लढा होणार आहे आणि त्याची शेवटची लढाई या 'दिबाक' शहरात होणार आहे. ती लढाई इस्लामने जिंकली की, सर्व जग इस्लाममय होणार आहे. तर असं 'दिबाक' या नावाने मासिक प्रकाशित होतं. २०१४ च्या ऑक्टोबरच्या मासिकात 'Revival of The Slavery Before Hour' या नावाचा एक लेख प्रकाशित झाला होता. हा एक Sex गुलामगिरी-संदर्भातील महत्त्वाचा दस्तऐवज आहे.

इस्लामिक स्टेटची एक महिला विंग आहे. त्या विंगचे नाव 'अल-खानसा' ब्रिगेड. या 'अल-खानसा' ब्रिगेडच्या महिलासदस्यांनी शब्दांकन केलेला एक जाहीरनामा (Manifesto) प्रकाशित आहे. 'अल-खानसा' हा इस्लामिक स्टेटचा अधिकृत महिलाविभाग आहे. त्यांनी प्रकाशित केलेल्या जाहीरनाम्याचे नाव 'Women of the lslamic State : Manifesto & Case Study' असे आहे. (अर्थात मूळ जाहीरनामा अरेबिक लिपीमध्ये आहे, पण त्याचे इंग्लिश भाषांतर

अनुक्रमणिका

उपलब्ध आहे.) या जाहीरनाम्यात काय आहे हे, लेखात पुढे येईलच; परंतु ही ब्रिगेड काय आहे हे, सांगणे गरजेचे आहे. या ब्रिगेडमध्ये मुख्यतः उच्चशिक्षित पाश्चिमात्य महिला कार्यरत आहेत. वीस वर्षांची एक ब्रिटिश मुलगी या ब्रिगेडमधली महत्त्वाची सदस्या आहे, (Leading Figure). पाश्चिमात्य उच्चशिक्षित महिलांनी इस्लामिक स्टेटसाठी ४१ पानांचा जाहीरनामा तयार केला आहे. हासुद्धा एक महत्त्वाचा दस्तऐवज आहे.

इराकच्या उत्तरेला असलेल्या 'माउंट सिंजार' या भागावर इस्लामिक स्टेटने २०१४ ऑगस्टमध्ये हल्ला केला, आणि तो भाग ताब्यात घेतला. या 'सिंजार' पर्वताच्या आसपास 'याझीदी' धर्माचे लोक राहतात. जगाच्या पाठीवर याझीदी एकूण १ लाख ते ५ लाख इतके आहेत. एकूण इराकच्या लोकसंख्येच्या केवळ १.५% हा समाज आहे. या धर्मात बाहेरून धर्मांतर करून जाता येत नाही. या धर्मात जन्मच घ्यावा लागतो. 'झोरोस्ट्रीयन' यांच्याशी साम्य असणारा हा धर्म आहे. म्हणून मुसलमानांच्या दृष्टीने 'काफिर' असलेल्या याझीदींचा उल्लेख इस्लामिक स्टेट Devil Worshippers असा करते. ऑगस्ट २०१४ मध्ये इस्लामिक स्टेटने हा प्रदेश ताब्यात घेतल्यावर स्त्रिया आणि पुरुष यांना वेगळे काढण्यात आले. १४ वर्षांच्या वरच्या सर्व पुरुषांची कत्तल करण्यात आली. आणि स्त्रियांना गुलामांच्या बाजारात विकायला काढलं. Sex Slave म्हणून त्यांचा वापर करण्यात आला. अशा पीडित महिलांपैकी काहींना इस्लामिक स्टेटच्या ताब्यातून सोडवण्यात यश आलं आहे. अशा मुलींची मनोगते उपलब्ध आहेत. त्या पीडित याझीदींच्या एका प्रतिनिधीला संयुक्त राष्ट्रात पाचारण करण्यात आलं होतं. त्या मुलीचं संयुक्त राष्ट्रसंघात झालेलं भाषण उपलब्ध आहे. स्वतःवर झालेले भयंकर अत्याचार स्वतःच्या तोंडाने सांगणा-या मुलींचे शब्द हासुद्धा एक महत्त्वाचा दस्तऐवज आहे. (अत्याचारांचे वर्णन पुढे आहे).

इस्लामिक स्टेट ज्या कुराणातील आयतींचा संदर्भ देत आहे, त्या ख-या आयती आहेत का हे पाहण्यासाठी कुराणसुद्धा पडताळून पाहिले आहे. ही सर्व साधने वापरून हा लेख तयार झालेला आहे.

**जाहीरनामा :**

'Women of the Islamic state' मध्ये मांडण्यात आलेली तत्त्वे ही इस्लामिक स्टेटची मार्गदर्शक तत्त्वे म्हणता येतील. स्त्रियांचे इस्लामिक स्टेटमधील स्थान काय आहे, हे सांगणारा हा जाहीरनामा आहे. जाहीरनामा सांगतो, आपल्या शरीराचा इंचन् इंच झाकला जाईल असे काळे कपडे स्त्रियांनी घातले पाहिजेत. यामध्ये पाय झाकणा-या बुटांचासुद्धा समावेश आहे. त्याचप्रमाणे हात व हातांची बोटे झाकली जातील असे ग्लोव्ह्जसुद्धा त्यांनी वापरले पाहिजेत. महिलांनी लपलेले असावे आणि मस्तक अच्छादित ठेवावे. आधुनिक पाश्चात्त्य कपड्यांच्या दुकानांवर बंदी असावी, कारण ते सैतानाचे कर्म आहे. प्रत्येक स्त्रीचे मुलभूत कर्तव्य आहे, की तिने आई बनावे आणि आपल्या नव-याची आणि मुलांची सेवा करावी. स्त्रिया अपवादात्मक परिस्थितीमध्येच घराच्या बाहेर पडू शकतात. उदा., जिहाद करण्यासाठी कोणी पुरुष उपलब्धच नसतील तर स्त्रिया घराबाहेर पडू शकतात. केवळ जिहाद करण्यासाठी. किंवा धर्माचा अभ्यास करण्यासाठी, (धर्म अर्थात इस्लाम).

या जाहीरनाम्यात कुराणमधल्या आयतींचा संदर्भ देऊन मुद्दा स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. Men are serving Women like themselves, men cannot distinguish themselves from women according to two features referred to by God : Men are incharge of women by [right of] what God has given over the other and what they spend [for maitenance] from their wealth (कुराण ४:३४)

या जाहीरनाम्यात मुलींनी कोणत्या वयात काय प्रकारचे शिक्षण घेतले पाहिजे, याचे स्पष्टीकरण आलेले आहे. वय वर्ष ७ ते ९ या बयाच्या मुलींनी तीन प्रकारचे पाठ घेतले पाहिजेत. एक – समज (Fiqh-Undrestanding) धर्म (Religion), दोन–कुराण आणि अरबी साहित्याचे लेखन आणि वाचन आणि

शास्त्र (Accounting आणि नैसर्गिक शास्त्र). १० ते १२ वर्षांच्या मुलींनी मुख्यतः धर्माच्या अभ्यासावर भर दिला पाहिजे. मुख्यतः त्याची समज (Fiqh) आणि त्याचबरोबर लग्न आणि घटस्फोटासंबंधीच्या दिल्या गेलेल्या निर्णयांचा अभ्यास केला पाहिजे. त्याचबरोबर विणकाम, शिवणकाम आणि स्वयंपाक हासुद्धा मुलींच्या शिक्षणाचा भाग असला पाहिजे. १३ ते १५ वर्षांच्या मुलींसाठी मुख्य भर 'शरीयाच्या अभ्यासावर' असेल. आणि मुलांचे संगोपन कौशल्याचा विकास यांवर असेल. या वयोगटात शास्त्राचा अभ्यास कमी होईल कारण; गरजेपुरते शास्त्र त्यांचे आधीच्या गटात शिकून झाले आहे. त्याचप्रमाणे इस्लामचा इतिहास आणि प्रेषितांचे आयुष्य आणि त्यांचे अनुयायी हा भाग या वयात शिक्षणात असला पाहिजे.

मुलींच्या लग्नाचे योग्य वय ९ असल्याचे जाहीरनाम्यात म्हंटले आहे. तथापि वयवर्ष १६-१७ पर्यंत लग्न झाले पाहिजे, असा जाहीरनाम्याचा आग्रह आहे. कारण तोपर्यंत मुली Young & Active असतात.

**अत्याचारांचे प्रकार :**

ज्या वेळी सिंजार ताब्यात घेण्यात आलं, तेव्हा १४ वर्षांवरील पुरुषांची कत्तल करण्यात आली. आणि सर्व स्त्रियांना गुलामांच्या बाजारात उभं करण्यात आलं. गुलामांच्या बाजाराची संपूर्ण व्यवस्था इस्लामिक स्टेटकडे पूर्वीपासून तयार होती. त्याचं अर्थशास्त्र त्यांच्याकडे तयार होतं. आणि म्हणून कोणत्याही प्रकारचा व्यवस्थेमधील ढिसाळपणा गुलामांच्या बाजारात दिसत नव्हता, असं पीडित मुलीने सांगितले आहे. शरीराचा आकर्षकपणा आणि स्तनांचा आकार लक्षात यावा म्हणून गुलामांच्या बाजारात मुलींना विवस्त्र करण्यात आलं होतं. गुलाम म्हणून विकत घेण्यापूर्वी स्त्रियांची कौमार्य चाचणी (Virginity Test) करण्यात आली. आकर्षकता, स्तनांचा आकार आणि कौमार्य या निकषांवर मुलींची किंमत ठरवून त्यांची विक्री करण्यात येत होती. त्यामध्ये सुंदर आणि लहान मुलींसाठी सर्वांत जास्त किंमत आकारली गेली.

हे नियोजन आधीच तयार होतं हे म्हणण्याचं कारण म्हणजे वरील निकषांच्या आधारावर आणि वयोमानाप्रमाणे खरेदीकिमतीचा तक्ता इस्लामिक स्टेटने यापूर्वीच प्रकाशित केला होता. ९ वर्षांच्या मुलीला १७० अमेरिकी डॉलर, वयवर्ष १० ते २० च्या मुलींना १३० अमेरिकी डॉलर आणि सर्वांत कमी म्हणजे ९० अमेरिकी डॉलर २० ते ३० वयोगटातील मुलींना. ही किंमत अर्थात प्रत्येक मुलीनिहाय बदलू शकते. मुलींची पैशाच्या भाषेतील किंमत flat chest & unattractiveness यांमुळे कमी होऊ शकते. हे सर्व पाहून 'लैंगिक अत्याचार' विषयी काम करणा-या संयुक्त राष्ट्रांच्या एका विशेष प्रतिनिधीने आपले मत व्यक्त केले आहे. ती म्हणते, "ISIS has institutionalised rape and sex slavery as a terror tactic. We have heard of 20 year old girl who was burned alive because she refused to perform extreme sexual act."

कोणत्या प्रकारचे अत्याचार या याझीदी मुलींवर झाले ते प्रत्यक्ष याझीदी मुलगी सांगते आहे. परंतु त्यापूर्वी अत्याचार फक्त याझीदींवरच का? याचं उत्तर इस्लामिक स्टेटनेच दिलं आहे. ते म्हणतात, "याझीदी People of the book नाहीत. याझीदी लोक अनेकेश्वरवादी आहेत. याझीदी लोक ज्या सात प-यांची पूजा करतात, त्यांपैकी एक 'तौस मलिक' हा देव नाही. (अर्थात अल्ला नाही. अल्लाशिवाय वेगळ्या देवाची पूजा हा इस्लामनुसारच सर्वांत मोठा गुन्हा आहे.) उलट, 'तौस मलिक' ही सैतानाची निर्मिती आहे. याझीदी लोकं सैतानांनी निर्माण केलेल्या देवाची पूजा करतात याचा अर्थ ते जिवंत राहायला लायक नाहीत. मुसलमानांनी हाती घेतलेला जिहाद यशस्वी व्हावा म्हणून (याझीदी) स्त्रियांना गुलाम म्हणून, आणि त्यांचा वापर शरीरसुखासाठी करण्याचा आम्हाला अधिकार आहे" अनेकेश्वरवादी, People of the book नाही आणि अल्लाशिवाय दुस-या देवांची पूजा करतात म्हणून अशा पाखंडी समाजाच्या स्त्रिया गुलाम म्हणून ठेवण्याचा इस्लामनुसार मुसलमानांना अधिकार आहे, असे इस्लामिक स्टेटचे म्हणणे आहे. त्या त्यांचे भयंकर अनुभव सांगतात. दर वेळेला जेव्हा एखादा जिहादी मुलीवर







अनुक्रमणिका

अत्याचार करायला यायचा, तेव्हा तो प्रार्थना करायचा. तो त्या मुलीला सांगायचा की, ही 'इस्लामी पूजा' (Ibadah) आहे. जिहादी योद्धा सांगायचा की मी मुलीशी संभोग केल्याने मी अल्लाच्या जवळ जाणार आहे. आणि म्हणून स्त्रीगुलामाबरोबर समागम हे पुण्य आहे. १९ वर्षांची मुलगी तिचे गुलामांच्या बाजारातील अनुभव सांगते, ती म्हणे, "जेव्हा माझी वेळ आली तेव्हा त्यांनी मला चार वेळा उभं राहून दाखवायला सांगितलं, त्यांनी मला स्वतःभोवती फिरून दाखवायला सांगितलं. त्यांनी मला माझ्या शेवटच्या मासिक पाळीबद्दलसुद्धा अनेक प्रश्न विचारले. त्यांना हे जाणून घ्यायचं होतं की, मी गर्भवती तर नाही ना!" गर्भवती स्त्रीबरोबर समागमाची परवानगी इस्लाम/शरीय देत नाही, असं इस्लामिक स्टेटचं म्हणणं आहे. एका ३४ वर्षांच्या याझीदी स्त्रीवर अनेकदा अत्याचार झाले; पण तिने आपल्या डोळ्यांसमोर १२ वर्षांच्या मुलीवर होणारे अत्याचार पहिले आणि ती स्वतःचं दुःख विसरून गेली, असे तिने सांगितले आहे. त्या १२ वर्षांच्या मुलीचे हाल ती ३४ वर्षांची स्त्री सांगते आहे- "He destroyed her body. She was badly infected. The fighter kept asking me, 'Why does she smell so badly? and I said she has infection on the inside, You need to take care of her. He ignored the girls' agony. continuing the ritual of praying before and after raping the child. I said to him she is just a little girl. He replied, "No, she is not a little girl. she is slave. and she knows exactly how to have sex. and having sex with her pleases God."

**याझीदींच्या वेदना :**

३ ऑगस्ट २०१४ मध्ये जेव्हा इस्लामिक स्टेटने याझीदींचा प्रदेश ताब्यात घेतला, तेव्हा पकडून, गुलामांच्या बाजारात ज्या मुलीला उभं केलं गेलं, जिची Sex Slave म्हणून विक्री झाली, जिच्यावर अनेकदा बलात्कार करण्यात आला, ती कशीबशी इस्लामिक स्टेटच्या ताब्यातून सुटून जर्मनीमध्ये आश्रयाला गेली. संयुक्त राष्ट्रसंघासमोर त्या 'धाडसी' मुलीचे मनोगत झाले. त्यामध्ये तिच्यावर झालेले अत्याचार आणि आंतरराष्ट्रीय समूहाला याझीदींच्या सुटकेसाठी काय काय करता येऊ शकते, यावर ती मुलगी बोलली आहे. साधारण १० मिनिटांचे ते भाषण आहे. त्यामध्ये ती सांगते, "आम्ही अल्लावर श्रद्धा ठेवत नाही, म्हणून जाणीवपूर्वक आमच्यावर अत्याचार करण्यात आले. ते केवळ आम्हाला मारायला आले नव्हते, त्यांना स्त्रिया आणि मुली गुलाम म्हणून हव्या होत्या. या सर्व गुलामांच्या देवघेवीमध्ये नियोजनाचा अभाव दिसत नव्हता हे सर्व सुनियोजित होतं. माझ्या डोळ्यासमोर माझ्या सख्ख्या भावांना गोळ्या घालून मारण्यात आले. मला माझा धर्म बदलण्यासाठी जबरदस्ती करण्यात आली. माझ्या बाकीच्या धर्मबांधवांना दोनच पर्याय देण्यात आले होते, धर्मांतर किंवा मृत्यू. सुदैवाने मी सुटू शकले, परंतु अजूनही ३४०० पेक्षा जास्त स्त्रिया त्या राक्षसांच्या हातात आहेत, जागतिक समूहाने लवकरात लवकर आम्हाला स्वाभिमानाने पुन्हा जगता यावं यासाठी काहीतरी प्रयत्न केले पाहिजेत."

**धर्म-शास्त्राचा आधार :**

इस्लामिक स्टेटच्या अभ्यासामधील हा सर्वांत गुंतागुंतीचा भाग आहे. मुळात 'इस्लामिक स्टेट' हा अमेरिका-इराक युद्धाचा एक परिणाम आहे, असाच समज सर्वत्र पसरलेला आहे. (अतुल कहते यांनी लिहिलेले मराठीमधील पुस्तक हाच धागा घेऊन इस्लामिक स्टेटचा अन्वयार्थ लावतात.) तो अंशतःच योग्य आहे; कारण 'इस्लामिक स्टेट' ही कल्पना अगदी सुरुवातीच्या काळापासून चालत आलेली आहे. अमेरिका-इराक हे एक तत्कालीन कारण असू शकेल. पण इस्लामिक स्टेटची निर्मिती झाली पाहिजे, असा आग्रह पहिल्या पासून होता म्हणून २१ व्या शतकातील इस्लामिक स्टेट जे जे काही करतं, त्याला ते कुराण व शरीय हादीसमधील संदर्भ देतात. याचं एक उदाहरण त्यांनी प्रकाशित केलेल्या जाहीरनाम्यात आलेलंच आहे, अशी उदाहरणे पुढेही अजून येणार आहेत. (इस्लामिक स्टेट म्हणजे काय? यावरसुद्धा मी दोन लेख लिहिलेले आहेत. त्यामध्ये केवळ अमेरिका–इराक युद्धाचा हा परिणाम

पीडित मुलींची मनोगतं सर्वत्र उपलब्ध आहेत. नाही, यावर मी संदर्भ देऊन लिहिलेले आहे. तेही सर्वांनी

वाचावे. ISIS चा पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष – भाग १– http://mukulranbhor.blogspot.in/2015/12/blog-post.html आणि ISIS चा पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष – भाग २ – http://muklranbhor.blogspot.in/2015/12/blog-post 25.html)

एक अभ्यासाचा दृष्टिकोन समोर आणायचा आहे. समजा, १८५७ चा उठाव झाला, त्याचा ब्रिटिशांनी लावलेला अर्थ म्हणजे हा 'उठाव' होता, सावरकर म्हणाले 'हे स्वातंत्र्यसमर' होतं. आता या लढाईला प्रत्यक्ष लढाई करणारे काय म्हणत होते? प्रत्यक्ष लढाई करणा-यांची भूमिका काय होती? कोणत्या हेतूंनी ती लढाई ते लढत होते हे, ब्रिटिश किंवा सावरकर यांच्यापेक्षा जास्त महत्त्वाचं आहे. तोच दृष्टिकोन इस्लामिक स्टेटच्या अभ्यासाला लावणे आवश्यक आहे. इस्लामिक स्टेट प्रत्येक कारवाईनंतर याचे स्पष्टीकरण देते आहे की, आम्ही जे वागतो आहोत ते मूळ इस्लामला धरून आहे. आम्ही अल्लाहला खूश करण्यासाठी असे वागतो आहोत वगैरे, तर त्याला जास्त महत्त्व आहे; बाकीचे इस्लामिक स्टेटबद्दल काय म्हणतात, याला फारसा अर्थ नाही.

स्त्रीच्या गुलामगिरीचा व्यवस्था म्हणून स्वीकार कुराणमध्ये आहे, अर्थात त्याचं आयातींच्या आधारे इस्लामिक स्टेट त्या व्यवस्थेचे समर्थन करते. त्यापैकी सुरह २ आयात १७७, ४:२४-२५, ४:९२, ५:८९ अशा आयती आहेत, या आयातींमध्ये गुलामगिरीचा व्यवस्था म्हणून स्वीकार आलेला दिसेल. ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर, शंकराचार्य हे भगवद्‌गीतेचे सर्वश्रेष्ठ भाष्यकार आहेत, त्याप्रमाणे सय्यद मौदुदी हे कुराणचे आणि मौलाना बुखारी हे हादीसचे सर्वश्रेष्ठ भाष्यकार आहेत. सय्यद मौदुदी २३:५-६ यावर भाष्य करताना sex slave girl is lawful असं सांगतात. प्रेषितांची एक हादीसमधील गोष्ट मौलाना बुखारी यांनी सांगितली आहे. त्यामध्ये युद्धलूट म्हणून ताब्यात घेतलेल्या स्त्रियांबरोबर लैंगिक संबंध ठेवणे पाप नसल्याचं प्रेषितांनी सांगितलं आहे, असं बुखारी लिहितात. मूळ इंग्लिश वाक्य आहे, Mohammad casually believes that slave women who are part of one fifth of the spoils of war can be treated like sexual property.

आयुष्यातील कोणत्याही प्रश्नाला उलेमांनी दिलेलं उत्तर म्हणजे 'फतवा'. फतवा जारी करण्याचा अधिकार कोणालाही मिळत नाही. कुराण, शरिया, हादीस, प्रेषितांचे चरित्र, इस्लामचा इतिहास, खालीफांचा इतिहास या सर्वांचा ज्याचा सखोल अभ्यास आहे, अशा इस्लामी पंडितालाच फतवा जारी करण्याचा अधिकार मिळतो. भारतात 'दर-उल-उलूम, देवबंद विद्यापीठाला' आणि मुंबईमधील रझा ॲकॅडमीला 'फतवे' जारी करण्याचे अधिकार आहेत. Sex Slavery किंवा गुलाम स्त्रीबरोबर संभोगाचा अधिकार या विषयावरचे अनेक फतवे वेबसाइट्सवर उपलब्ध आहेत.

ज्या वेळी ही सर्व व्यवस्था निर्माण होत होती, त्याच वेळी म्हणजे ऑगस्ट ते ऑक्टोबर २०१४ याच काळात इस्लामिक स्टेटकडून अधिकृत पातळीवर याचे स्पष्टीकरण करण्यात आलेले आहे. जसा 'दिबाक'या मासिकातील लेख आहे; त्याचप्रमाणे एक माहितीपत्रक इस्लामिक स्टेटने प्रकाशित केलेले आहे. त्यामध्ये Sex Slavery संदर्भात सर्व उपस्थित होऊ शकतील अशा शंका आहेत, आणि त्यांची उत्तरेही दिली आहेत. अर्थात मूळ माहितीपत्र अरेबिक लिपीमध्ये आहे, परंतु त्याचे इंग्लिश भाषांतर उपलब्ध आहे.

'जिहादी टेररीझम थ्रेट मॉनिटर' नावाची एक वृत्त-संस्था आहे. ती वृत्तसंस्था सांगते की, आमचा विशेष अभ्यासाचा विषय आहे 'मूलतत्त्ववादी दहशतवाद'. इस्लामिक स्टेटबद्दलच्या सर्व सविस्तर बातम्या या वृत्त संस्थेच्या वेबसाईटवर सापडतील. याच वेबसाइटवर हे मूळ 'अरेबिक लिपीतील' माहितीपत्र आणि त्याचे इंग्लिश भाषांतर उपलब्ध आहे. त्यामध्ये एकूण २५ प्रश्न-उत्तरे आहेत. सर्व देणे शक्य नाही. तरी कोणताही प्रश्न सुटणार नाही या पद्धतीने सारांश फक्त सांगतो.

इस्लामची भूमी नसलेल्या प्रदेशातील म्हणजे 'दार--उल-हरब' मधील स्त्रिया पकडून कैदी बनवण्याची परवानगी त्यांना (म्हणजे मुसलमानांना) आहे, असं ते म्हणतात. त्यांना कैदी बनवण्याची परवानगी मिळते, कारण त्या (स्त्रिया) श्रद्धाहीन आहेत, त्यामध्ये ज्यू आणि

ख्रिश्चन स्त्रियासुद्धा येतात. 'किताबी' नसलेल्या स्त्रियांचे श्रद्धाहीनत्वच त्यांना कैद करण्याची परवानगी आम्हाला (म्हणजे इस्लामला) देतं, असं ते सांगतात. अनेकेश्वरवाद हा एक महत्वाचा मुद्दा आहे. 'दार-उल-हरब' मधील कैदी बनवलेली स्त्री, जी श्रद्धाहीन आहे (अल-साबी), तिच्याबरोबर शारीरिक संबंध ठेवण्याची परवानगी आम्हाला (इस्लामिक स्टेटला) अल्लाहनेच दिली असल्याचे ते सांगतात. प्रश्न क्रमांक ४ मध्ये अशी परवानगी आहे, ह्याचा कुराणमधील आयतीचा संदर्भ दिला आहे. युद्धभूमीतून अशा पकडून आणलेल्या स्त्रियांचे 'जिहादी योद्ध्यांमध्ये' इमाम वाटप करतो. वाटून दिलेल्या स्त्रियांची आधी कौमार्यचाचणी करण्यात येते. जर जिहादी योच्या ताब्यात मिळालेली स्त्री गर्भवती नसेल तर, ताबा मिळाल्याक्षणी तिच्याशी शारीरिक संबंध ठेवण्याची परवानगी जिहादी योद्ध्याला आहे, असं ते म्हणतात. आपली गुलाम (स्त्री) गर्भवती राहू नये, याची मात्र 'जिहादी योद्धे' काळजी घेतात. अशा 'अल-साबी' ('दार-उल-हरब' मधील कैदी बनवलेली स्त्री, जी श्रद्धाहीन आहे) स्त्रिया विकता येतात, विकत घेता येतात. त्याचप्रमाणे त्या बक्षीस म्हणूनही देता येतात. 'अल-साबींकडून' इस्लाम धर्माला आणि जागतिक इस्लामला कोणत्याही प्रकारचा धोका पोचेल अशी शंका जरी आली, तरी त्यांना नष्ट करण्याचीसुद्धा 'जिहादी योद्ध्यांना' परवानगी आहे. जिहादी योद्धा आणि गुलाम स्त्री यांच्या संबंधातून जन्माला आलेल्या मुलगा/मुलगी सज्ञान (म्हणजे वयवर्ष ९) होईपर्यंत त्याचा संपत्ती म्हणून वापर करता येत नाही. मुलगा/मुलगी सज्ञान होईपर्यंत त्यांना त्यांच्या आईपासून दूरसुद्धा करता येत नाही.

एखादा जिहादी योद्धा मारला गेला, तर त्याच्या अन्य संपत्तीप्रमाणे गुलामांचीसुद्धा वाटणी होईल. मात्र अशा स्त्रियांबरोबर शरीरसंबंध ठेवता येणार नाहीत. तिच्याकडून फक्त सेवा करवून घेणे अपेक्षित आहे, असं ते म्हणतात. जिहादी योद्ध्याच्या परवानगीशिवाय गुलामांबरोबर शरीरसंबंध ठेवता येणार नाहीत. ते दुस-याच्या संपत्तीवरचे अनधिकृत अतिक्रमण समजले जाईल. परंतु ती संपत्ती विकत घेऊन हा प्रश्न सोडवता येईल, असे ते म्हणतात.

शरीरसंबंधासाठी योग्य अशा वयात मुलगी आली की तिच्याशी संभोग करावा, मुलगी अजून वयात आली नसेल तर मात्र संभोगाशिवाय तिचा उपभोग घेता येऊ शकतो, असे त्याचे स्पष्टीकरण देण्यात आलेले आहे. शरीरसंबंधांच्या दरम्यान जास्तीत जास्त शरीरसुख देणा-या 'कोणत्याही' तंत्राचा वापर पुरुष स्त्री गुलामच्या परवानगीने किंवा परवानगीशिवाय करू शकतो. स्त्री गुलामाला मारहाण करणेसुद्धा क्षम्य मानले आहे. परंतु चेह-यावर मारहाण करू नये, असे संकेत आहेत. स्त्रीगुलाम आपल्या मालकापासून जर पळून जायचा प्रयत्न करत असेल, तर तो अक्षम्य गुन्हा मानला गेला आहे; तथापि या गुन्ह्यासाठी कोणतीही शिक्षा कुराण किंवा शरियामध्ये ठरवून दिलेली नाही. ती शिक्षा तो मालक स्वतः च्या मर्जीने देऊ शकतो. स्त्रीगुलामाबरोबर लग्नसुद्धा करण्याची परवानगी आहे. परंतु दुस-या योद्ध्याच्या स्त्रीगुलामाबरोबर लग्न केले तर मात्र शरीरसंबंधाचा अधिकार कायदेशीर रीत्या लग्न झालेल्या पुरुषाला मिळेल, मालकाला नाही.

सर्व प्रश्न, उत्तरं वाचून असं लक्षात येईल की या जिहादी योद्ध्यांची अल्लाहवर, कुराणवर, शरीयावर श्रद्धा आहे. सर्व समस्यांना, सर्व प्रश्नांना, सर्व शंकांना उत्तरं ते त्यातूनच (कुराण, प्रेषितांचे आयुष्य, शरिया, हदीस) देण्याचा प्रयत्न करतात.

**सुटकेसाठी प्रयत्न** :

याझीर्दींच्या सुटकेसाठी कमी-अधिक प्रमाणात जागतिक पातळीवर प्रयत्न सुरू आहेत. परंतु जागतिक पातळीवरचे थोडे प्रयत्नसुद्धा लगेच जगासमोर येतात, पण प्रादेशिक पातळीवरचे मोठे प्रयत्न सहजासहजी जगासमोर येत नाहीत. भारतातील योगगुरू श्री श्री रविशंकर यांची स्वयंसेवी संस्था Art of Living इराकमध्ये मदतकार्य करत आहे. Art of Living चे अनेक कार्यकर्ते जिवावर उदार होऊन तिथे मदतकार्य करत आहेत. १० अमेरिकी डॉलरच्या बदल्यात एका अल्पवयीन मुलीवर अनेकदा बलात्कार करण्यात आला होता, त्या मुलीला सोडवण्यात Art of Living ला यश आलं आहे. त्याचबरोबर अत्यल्प दरामध्ये पाणी आणि अन्नसुद्धा हे कार्यकर्ते उपलब्ध करून देत आहेत.

अनुक्रमणिका

साधारण २००० वर्षांपूर्वी इस्लामपूर्व अरब टोळ्यांनी पॅलेस्टाइन ताब्यात घेतलं. तिथे असलेल्या ज्यूंना हाकलून दिलं. त्या वेळी ज्यू भारतात आश्रयाला आले. ते अजूनही भारतात आनंदाने राहत आहेत. त्यानंतर इस्लामी आक्रमकांनी पर्शियावर हल्ला केला आणि पर्शिया उद्धवस्त केलं. त्या वेळी पारशी लोक भारतात आले, ते अजूनही भारतात आनंदात राहत आहेत. ज्यू आणि पारशी आज मूळ भारतीय समाजातून वेगळे काढता येत नाहीत, इतके एकरूप झाले आहेत. हा पूर्वइतिहास लक्षात घेऊन पुन्हा इस्लामी आक्रमणाला बळी पडलेला 'याझीदी' समाज पुन्हा एकदा भारताकडे आशेने बघतो आहे. १ फेब्रुवारी २०१६ रोजी याझीदीचे एक शिष्टमंडळ 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे' सरसंघचालक मोहन भागवत यांना बंगळूर येथे भेटले. यामध्ये समान आक्रमणाच्या इतिहासावर, भारताने ज्यू आणि पारशी समाजाला दिलेल्या वागणुकीवर चर्चा झाली. मला याची खात्री आहे की, उद्या भविष्यात गरज पडली तर ज्यू आणि पारश्यांप्रमाणे भारत 'याझीदींच्या' मागेसुद्धा उभा राहील.

**समारोप** :

इस्लामचा अभ्यास करताना एक मुद्दा सतत लक्षात ठेवावा लागतो. तो आहे कुराणचे कालक्रमानुसार पडणारे दोन भाग. एक मक्काकाळ आणि दुसरा मदिनाकाळ. या दोन काळात बदललेल्या परिस्थितीनुसार परस्परविरोधी आयती सुद्धा आलेल्या आहेत. तेव्हा ही बदललेली परिस्थिती नेमकी काय होती, याचा अभ्यास हिंदूंनी करणे आवश्यक आहे. नाशिकमधील प्राध्यापक संतोष शेलार यांनी या संदर्भात लिहिले आहे की, बरेच अभ्यासक 'इस्लाम' कसा धर्मसहिष्णू आहे हे सांगताना ठरावीक ६-७ आयातींचा संदर्भ देतात. या आयती मक्काकालीन आहेत. त्या वेळी प्रेषितांची शक्तीही कमी होती. मदिना-काळात मात्र या सर्वधर्मसमभावी भासणा-या आयती येणे बंद झाले होते, याउलट उघडउघड आक्रमक आयतीच आल्या आहेत'. हे मात्र नक्की की, 'इस्लामिक स्टेट' आपल्या सर्व कार्यपद्धतीची दिशा, कुराण', 'शरिया', प्रेषितांचे आयुष्य', 'पहिले चार खलिफा' यांच्यातूनच दाखवत आहे. अल्लाहला खूश करण्यासाठी, स्वर्गात जागा मिळावी म्हणून, नारकाग्नीपासून मुक्तता मिळावी म्हणून आम्ही हे सर्व करत आहेत, अशी त्यांची भूमिका आहे. या त्यांच्या भूमिकेचा सखोल अभ्यास आपण केला पाहिजे.

या सर्वांतून मला अजून न सुटलेला प्रश्न एकच आहे, तो म्हणजे उच्चशिक्षित पाश्चात्त्य आणि पौर्वात्य तरुण/तरुणी इस्लामिक स्टेटकडे आकर्षित होण्याचे कारण काय असेल? इस्लामिक स्टेटमध्ये असं कोणतं आकर्षण आहे, की ज्यामुळे पुरुष आणि महिलासुद्धा जीव द्यायला आणि तितक्याच क्रूरपणे जीव घ्यायला तयार होतात? मध्ययुगीन धार्मिक कक्षेतून माणसं कधी बाहेर येणार?

✷✷✷

# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - ५

श्री. के. वनपाल

बुलढाण्याला जिल्हा परिषदेचा मुख्य कार्यकारी अधिकारी म्हणून कार्यभार स्वीकारल्यावर मला उत्सुकता होती की, ही विदर्भातील मंडळी शेती कशी करतात, कुठली पिकं घेतात, बी-बियाणं, पाणी, खत यांचा वापर कसा करतात आणि मुख्य म्हणजे शेतीसाठीच्या पाण्याचं नियोजन कसं करतात?

कमिशनर ऑफिसच्या मीटिंगसाठी अमरावतीला जायचे होते. अमडापूरमार्गे गेलो तर तिथल्या भल्या-मोठ्या तळ्याची पाहणी करता येईल असा विचार करून त्यामार्गे निघालो. गाडीत मी आणि ड्रायव्हर कलीम. कलीमला विचारलं, 'हे तळं कुणाच्या काळात - म्हणजे कुणी बांधलं?' त्यानं चिखलीच्या आमदाराचं नाव सांगितलं. हे आमदार काही काळ मंत्री होते आणि तेही इरिगेशन खात्याचे. पश्चिम महाराष्ट्रातले पुढारी. बंधारे, मोठे तलाव, मोठी धरणे, बांधतात असे त्यांनी पाहिले होते म्हणून त्यांच्यासारखं आपण काहीतरी केलं पाहिजे यासाठी त्यांनी इकडच्या इरिगेशनच्या इंजिनिअर्सना हाताशी धरून हा प्रोजेक्ट पुर्ण केला, असं कलीम म्हणाला. एवढ्या माहितीचा मला फारसा उपयोग नव्हता. वाटेत अमडापूर आल्यावर ते तळं मी पाहून घेतलं आणि अमरावतीला मीटिंगसाठी गेलो.

प्रवासात, परत येताना, सारखा अमडापूरच्या तळ्याचाच विचार सतावत होता. कारण ही तसंच होतं. इतकं मोठं तळं पण त्याच्या आसपास बागायती शेती कुठं दिसत नव्हती.

एके दिवशी ठरवलं की, त्या गावाला भेट द्यायची आणि जाणून घ्यायचं की, हे तळं कशासाठी बांधलं आणि याचा उपयोग काय? ह्या गोष्टी इरिगेशन खात्याला, संबंधित पंचायत समितीला आणि गावक-यांना विचारायला हव्यात. एके दिवशी मी पी. ए. ला सांगून इरिगेशनच्या अधिका-याला बोलावून घेतलं. विचारलं, "हे अमडापूरचं तळं कुणी आणि कधी बांधलं?"

"ते इरिगेशनच्या नॉर्म्स प्रमाणं पाटानं पाण्याची व्यवस्था करण्यासारखं प्रोजेक्ट नव्हतं. कारण तशी ती फीजिबल साइट नव्हती. फीजिबल साइटसाठी दोन डोंगरांच्यामधली साइट असावी लागते. म्हणजे सांडवा काढून आजूबाजूच्या शेतीला पाटानं पाणी पुरवता येतं. म्हणून आमच्या खात्यानं हा मार्ग काढला की, ह्या मोठ्या तलावातलं पाणी आसपासच्या गावातल्या लोकांनी इरिगेशनच्या छोट्या छोट्या सोसायट्या करून इंजिन टाकून, उपसावं आणि आपली जमीन बागायती करावी."

"मग अडलं कुठं? कोल्हापूरला तर के. टी. वेअर्स म्हणजे कोल्हापूर पद्धतीचे बंधारे उभे करून शेतकरी आपल्या शेतीत पाणी नेतात. त्यांना फक्त पाणी दिसलं पाहिजे; की ते लगेचच उड्या मारतात."

तो इरिगेशन इंजिनिअर हसला. दोन मिनिट काहीच बोलला नाही. मग म्हणाला, "सर, तुम्ही पश्चिम महाराष्ट्रातले तुमचं बुलढाण्यातलं जी. प. चं. शेतीचं मॉडेल फॉर्म मी पाहिलंय; पण तसलं प्रकरण इथे होण्यासारखं नाही."

"पण ते मी इथं तुमच्या समोर करून दाखवलंय! अन् ते काही मी एकट्यानं केलेल नाही. इथलीच माणसं होती ते सगळं करायला."

"ते खरं आहे हो, पण ते करून दाखवायला मूळ तुम्ही स्वतः लक्ष घालत होतात. इथं तसं कोण लक्ष घालणार?"

"म्हणजे, हे पाणी समोर दिसत असताना लोक स्वस्थ बसणार? पाण्याकडे पाहत राहणार? छोट्या छोट्या सोसायट्या करायला त्यांना काय अडचण आहे?"

"सर, तो प्रयत्न आम्ही करून पाहिलाय. कोणताही प्रतिसाद मिळाला नाही. सात-आठ वर्षं झाली. ते मिनिस्टरही हताश झाले."

"मला काय वाटतं की, थोडे प्रयत्न केले तर लोकांना बरोबर घेऊन हे काय करता येईल. माझ्या जि.प.च्या

अनुक्रमणिका

प्रोजेक्टसारखं हे प्रोजेक्टही आपल्याला मार्गी लावता येईल. तुम्ही येणार का माझ्याबरोबर?"

"यायला काही हरकत नाही. पण सांगू का, एकदा तुमचं तुम्हीच त्या गावाला जाऊन सगळ्या गावक-यांना विचारून ते काय म्हणतात ते पहा. 'हो' म्हणाले तर बाकी सगळ्या सोसायट्या उभ्या करायला, त्यांची योग्य ती जोडणी करायला तुम्ही म्हणाल तितके कष्ट मी घेईन. माझ्या वरिष्ठांकडून मुद्दाम वेळ काढून हे आपण करू."

"ठीक आहे, तुम्ही म्हणताय तेही मला पटतं. मीच एकदा प्रयत्न करून बघतो."

"अच्छा, बाय", असं म्हणून तो अधिकारी उठला. पण त्याच्या डोळ्यांत 'हे काही खरं नाही' हे भाव स्पष्ट दिसत होते.

(१)

१) चिखलीच्या पंचायत समितीचे सभापती, सरपंच, अंमडापुरची मंडळी यांना निरोप देऊन एके दिवशी मी अंमडापूर गाठल. सी.इ.ओ. स्वतः आलेत म्हटल्यावर ग्रा. पंचायतीजवळ खूप माणसं जमली. त्यांच्या चेह-यांवर उत्सुकता दाटलेली दिसत होती. सभापती आणि सरपंच तर चांगलेच खुषीत होते. संध्याकाळची वेळ होती. सरपंचाची प्रस्तावना संपल्यावर मी मुद्यालाच हात घातला.

"माझ्या बंधूनो!" — टाळ्यांचा प्रचंड कडकडाट!!

"मला खूप हायसं वाटलं."

"एकुण हे १२०० हेक्टरला पाणी पुरवणारं तळं! हे तुम्ही वापरावं म्हणून तुम्हाला विनंती करायला आलोय."

पुन्हा टाळ्या..........

"तळ्याची क्षमता ८०० हेक्टर शेतीच्या सिंचनासाठी आणि ४०० हेक्टरची क्षमता आसपासच्या गावांना पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करण्यासाठी राखून ठेवली आहे. ८०० हेक्टर जमीन सिंचनाखाली आणण्याइतकी क्षमता म्हणजे थोडी नव्हे. सिंचन खात्याच्या सूचनांप्रमाणे आपण छोट्याछोट्या सोसायट्या स्थापन करू. सीडमनी म्हणून ५% लोकवर्गणी लोकांनी उभी करायची; बाकीची व्यवस्था सहकार खात्यातले अधिकारी आणि सिंचन खात्यातले अधिकारी करतील. म्हणजे १-२ महिन्यांत ही सगळी प्रक्रिया पूर्ण होईल! काय?"

ज्या बाकीच्या बारीकसारीक गोष्टी करायला हव्या होत्या, त्यांची जंत्रीच मी बरोबर ठेवली होती. त्याबद्दलही मी विस्ताराने बोललो. माझ्या भाषणानंतर मी लोकांच्या प्रतिक्रिया आजमावत होतो.

सरपंच, सभापती माझ्या वतीने लोकांना उद्युक्त करीत होते. "बोला, बोला सी. इ. ओ. साहेब त्यांचे काम सोडून मुद्दाम आपल्याला भेटायला आले आहेत, त्यांना आपण सांगितले पाहिजे काहीतरी," अस म्हणून लोकांना समजावत होते.

खुप वेळ कोणीच काहीच बोललं नाही. मग ब-याच वेळानं सरपंच म्हणाले, "लगेच काही हे सांगायला जमायचं नाही. ५% वर्गणी वगैरे म्हटल्यामूळे लोक भांबावले असतील. आम्ही आमचीच एक मीटिंग घेऊन काय ठरतंय ते तुम्हाला पुन्हा इथं बोलावून सांगू. वेळ खुप झालाय. आता सगळीजणं जेवायला जाऊ."

"म्हणजे जेवणाचा घाट घातलाय का?" — मी

"म्हणजे काय साहेब? मुद्दाम वेळ काढून तुम्ही आमच्या भल्यासाठी इथं आलात आणि आम्ही तुम्हाला न जेवता पाठवू? अहो, हा विदर्भाचा धर्म आहे, आलेल्या पाहूण्याला जेवायला ठेवून घ्यायचा. चला सगळी तयारी झाली असं."

मिरच्यांची भाजी, डाळबाठी, चुरमा, जिलबी, कढी, खिचडी अशा अनेक पदार्थांनी भरलेली थाळी – थाळी कसली, थाळाच पुढं आला. सरपंच, सभापती, पाटील अशी प्रतिष्ठित आठ-दहा माणसं पंचायतीच्या सभागृहात आणि बाकीची तिथेच पंचायतीच्या बाहेर अशी व्यवस्था होती. अतिशय प्रेमळपणाने आणि आग्रहाने सगळ्यांनी जेवण वाढलं. खूप तृप्त वाटलं.

"मग आता तुमचं काय ठरतंय ते केव्हा कळवणार? मी पाठीमागे लागणार हं तुमच्या. हे सुग्रास जेवण प्रकल्प पुरा झाल्यावर दिलं असतंत तरी चाललं असतं. पण पुन्हा असंच जेवण देणार असाल तर प्रकल्प पुर्ण झाल्याशिवाय इथं जेवणार नाही. काय?"

"काही काळजी करू नका, साहेब. या आठवड्यात घेतो आम्ही मीटिंग आणि काय ते सांगतो आफिसला येऊन."

मला कळेना ही मंडळी अशी का चाचपडली?

अनुक्रमणिका






एवढं मी जिलबीचं ताट घेऊन आलोय आणि ही अशी काय आढेवेढे घेतात? तथापि असेल एखादं छोटंसं कारण अशी समजूत करून घेऊन मी अमडापूर सोडलं.

(२)

काही दिवस गेले. दर दिवशी मी अमडापूरची काही बातमी येतेय का, याची वाट बघत असायचो.

एके दिवशी आला निरोप. "साहेब, तुमच्या सवडीनूसार पुढच्या आठवड्यात केव्हाही या. मात्र असंच संध्याकाळच्या वेळेला या."

मी खुष! एका मोठ्या प्रकरणात हात घालतोय. ते प्रकरण मी इथे आहे तोवर मार्गी लागलं तर त्यासारखा आनंद नाही!

गेलो संध्याकाळ साधून मागच्यापेक्षा खुपच जास्त माणस जमलेली दिसली. या वेळी तर ओवाळायला सुवासिनी, स्वागतपर पद्य वगैरे विधीही त्यांनी ठेवलेले. त्यामुळे तर आता निश्चितच फलनिष्पत्ती होणार; याची जाणीव झाली.

"साहेब बोला, आपल मनोगत सांगा! आम्ही तर काही कुणी बोलणार नाही."

मला बरेच वाटलं कारण "आता या ठिकाणी" अशासारखं बरंच काही सटरफटर ऐकण्याचं टळलं होतं.

"ठीक आहे. मी काय बोलणार? तुम्हाला तर विषय माहीतच आहे. तुम्हालाच काही विचारायचं असल्यास विचारा. माझ्याबरोबर हे इरिगेशनचे अधिकारीही आले आहेत. त्यांची तर आपल्याला खूप मदत होणार आहे. मला फक्त एवढंच सांगा, सोसायट्या लहानमोठ्या कराव्या लागतील. तशा किती सोसायट्या करायच्या? तुमच्या सभांमध्ये काय ठरलं?"

बराच वेळ सगळेजण शांत पण कुजबुजीतून असं वाटत होतं की, कुणी बोलायचं..... वगैरे ठरत होतं.

जरा वेळानं एकजण सुमारे ५० वर्षांचा शेतकरी उठून उभा राहिला. मी सगळ्या जीवाचा कान करून त्याच्याकडे पाहत होतो.

"साहेब, खर बोलू की आपलं तोंडदेखलं बोलू?"

"असं कसं? अगदी खरंखरं तुमच्या मनातलं बोला. मी तुमचं कोणतंही उत्तर ऐकायला तयार आहे."

"अगदी तुम्हाला सगळं खरंखरं सांगितल तरी?"

"हो, तरीही." — मी.

"न्हाई, रागावू नका. एक अपायही सांगतो अन एक उपायही सांगतो."

"ठीक आहे. काहीही सांगा. आपण अपायावर उपायही शोधू." — मी.

"त्याच काय आहे, सोसायटी करायची म्हणजे एका सोसायटीत कमीतकमी ११ जण हवेत. अशा लहान-मोठ्या साधारण ८ ते १० सोसायट्या कराव्या लागतील. पहिल्यांदा लहान सोसायट्यांचं पाहू. अशा चार सोसायट्या करायच्या म्हटल्या तरी ४४ जण तयार हवेत! तेही अगदी मनापासनं. आम्ही आमच्यात बसलो होतो. मागच्या आठवड्यात. पण अशी माणसं जमायलाच खूप वेळ लागला! आणि भलताच मुद्दा निघाला."

"काय? काय मंडळी बोलली त्या मीटिंगमध्ये?" -– "मी सांगतो, सगळं सांगतो — तुम्ही ते ५% बीज भांडवलाचं बोलला होतात. पहिल्यांदा काहीजण थोडे बिचकले. पण नंतर म्हणाले की, ते मिळायला, म्हणजे डी.सी.सी. बँकेत ते मिळायलाच वेळ लागेल. कारण, बँकेलाही ते बोर्डात मंजूर करायला वेळ लागेल. समजा तो मुद्दा बाजूला ठेवला आणि घातले आपआपलेच ५% तरी ते काही आपल्याला जड नाही, असंही लोक म्हणाले."

"वा, हे तर फारच छान!"– मी.

"छान तर आहेच. पण पुढच ऐका. लोक म्हणतात की, चार सोसायट्यांना ४ चेअरमन, हो की नाही?"

"हो, ते ओघानच आलं." — मी.

"लोक म्हणतात, हे चार चेअरमन काय करतील, कसं वागतील, ते सांगता येत नाही. त्यांच्यावर विश्वास कसा ठेवायचा? अन् मुख्य म्हणजे ते या सोसायटीचं काम करायला वेळ कुठून देणार?"

"म्हणजे? अहो, संध्याकाळी आपण शिळोप्याच्या गप्पा मारायला बसतो की नाही? काढायचा त्यातलाच वेळ!" —मी.

"ठीक आहे. मीही त्यांना तेच म्हणालो. पण मुद्दा ऐका. असे चार जण पुढे येतील. त्यांच्या वागण्याचं काय? अहो, ते एकदा पुढारी झाले की, शिरलाच त्यांच्या अंगात कली."

"म्हणजे? मी नाही समजलो," – मी.

"त्याचं काय आहे, आमच्याकडं एकदा कोणी पुढारी झाला की, त्याला त्या कामाचा विसर पडतो. यातनं आपल्याला काय मिळणार, याचा तो पहिल्यांदा विचार करतो. म्हणजे समजा, सोसायटीसाठी इंजिन, पाइप-लाइनसाठी पाइप, नट हायपन बोलट, रॉड हे सगळं उभं करायचं म्हटलं तर या प्रत्येक आयटममधलं आपलं कमिशन किती, याचा तो विचार करणार आणि तो आणायला गेला, तर व्यापारीही त्याला कितीची पावती करू, म्हणून विचारणार – अगदी शंभर टक्के! मग या मोहातन तो कसा बाहेर पडणार? अन् मग हे कमिशनवर उभं राहिलेलं प्रोजेक्ट कसं तग धरणार? सोसायटीच्या मेंबरांच्या मनात हेच सारखं खदखदत राहणार, होय की नाही?"

"हा तुमचा निगेटिव्ह विचार झाला. हे चेअरमन आणि सेक्रेटरी थोडेसे शहाणे निघाले, संवेदनशील निघाले, तर हे चित्र उलटं दिसणार नाही का?" – मी.

"अगदी बरोबर पण काही तसे निघाले तर?"

"अहो, एखाद्-दुसरी सोसायटी करून पहा ना! त्याचा अनुभव चांगला आला तर त्याप्रमाणं दुसरी सोसायटी होईल ना प्रेरणा! आणि हळूहळू हे होईल यशस्वी." – मी.

"आत्तापर्यंत अपाय सांगितलां ना? आता उपाय सांगतो. आमचा काही आमच्यातून आलेल्या चेअरमनवर विश्वास नाही. त्याबद्दल खूप विचार झाला आहे" एकदोघं म्हणाले, "या सोसायटीत पैसे घालण्यापेक्षा स्वतःचे एक बोअर मारून त्यात ५० हजार रुपये घातले तर आपल्या स्वतःच्या कष्टाची आणि स्वतःची बागायती शेती होईल. त्यात झाला तरी आपलाच तोटा आणि आपलाच फायदा. सोसायटीच्या प्रकरणात कोण पैस खातंय आणि कोण ती चांगली चालवतंय की वाईट चालवतंय, याचाच विचार येत राहणार. तेव्हा ते काही नकोच.

"पण तरी आम्ही तुम्हाला नाराज करत नाही. एक उपाय सांगतो. आम्ही काहीजण एक-एक एकर जमीन, जवळजवळचीच, काढून तुम्हाला कसायला देतो. त्यातलं उत्पन्न तुमचंच शिवाय शिवारात एक फार्म हाउस बांधून देतो. त्यात तुम्ही राहायचं. नाहीतरी आता तुम्ही लवकरच रिटायर होणार, तेव्हा उरलेला वेळ तुम्हाला तुमच्या आवडीच्या कामासाठी मिळंल. हे सगळं तुम्ही सांभाळलं तर तुम्ही म्हणाल ती मदत आम्ही दररोज तुमच्यापाशी येऊन करू. पण सगळी सूत्रं तुमच्याकडं देतो. बघा विचार करून. आम्ही काही भलतचं सांगत नाही. नाही म्हणायसाठी गोष्ट काढली असंही समजू नका. अगदी मनापासूनचा हा आम्हा काही लोकांचा विचार झाला बघा..."

"अहो, हा कसला प्रस्ताव? मी एक अधिकारी. त्यातून पश्चिम महाराष्ट्रातला, रिटायर झाल्यावर मी माझ्या गावी जाऊन माझ्या गावचा विकास करायचं ठरवलंय आणि शिवाय तुमचं हे विदर्भातलं उष्णतेचं हवामान मला कसं सहन होणार? माझी पोरं, नातवंडं मला इथं कशी राहू देतील? पण तुम्हाला माझ्याबद्दल एवढं आकर्षण का? तुमच्यातला एखादा नाही का तयार होणार?" – मी.

"मग मघाशी काय सांगितल? त्या सगळ्या गोष्टीचा पुरेपूर विचार करूनच आम्ही हा प्रस्ताव मांडलाय ना? तुम्ही अगदी आमच्या भूमिकेतनं विचार करून बघा. आमचा आमच्यावर विश्वास नाही पण तुमच्यावर शंभर टक्के आहे. खात्री आहे की, तुमचा उद्देश फक्त आमचं चांगलं व्हावं असाच कायम राहणार. तुमच्या मनात भ्रष्टाचाराचं भूत शिरणारच नाही. आणि आम्ही आहोत की दररोज तुमच्या मदतीला. आम्ही काही ते सगळं तुमच्यावर टाकून पळ काढणार नाही."

वाटलं, शंकराचार्यसुद्धा ह्या वादात हरले असते. मी तर काय सामान्य अधिकारी.

"साहेब, रागावू नका, जे उघडंनागडं सत्य आहे, ते ठेवलं तुमच्यासमोर. आम्हाला तुमची तळमळ, कळकळ सगळी कळली, म्हणूनच स्पष्टपणे तुमच्यापुढं सगळं सांगितलं.

"आता जेवायला चला. खूप उशीर झालाय. आणि ते 'तुमचं प्रोजेक्ट पूर्ण झाल्याशिवाय मी जेवणार नाही', हे काही चालणार नाही. उठा —"

***






पुस्तक परीक्षण

# न सांगण्याजोगी गोष्ट

विश्वास दांडेकर

कुठलाही समूह – मग ते एखादे राज्य, राष्ट्र अथवा आजच्या परिभाषेत राष्ट्रराज्य असेल – त्याचे एक समूहमन असते. या समूहमनाच्या काही श्रद्धा असतात, काही संचित असते. व्यक्तिजीवनात जशा उलटलेल्या काळातल्या कडूगोड आठवणी असतात, तशा समूहमनातही असतात. त्यांतल्या काही आठवणी या कटू असतात. सोमनाथाच्या देवळाची लूट आणि वास्तू नष्ट करण्याचा प्रयत्न ही आठवण शतकानुशतके भारतीयांच्या समूहआठवणीत खोलवर चरत गेलेली जखम आहे. महाराष्ट्राच्या आठवणीत 'पानिपत १७६१' ही अशीच तीव्र व कडू आठवण आहे मेवाडदेखील हळदीघाटी विसरू शकत नाही.

याच आठवणी का राहतात, हे नेमके सांगणे जरा अवघड आहे. १७५७ ची प्लासीची लढाई प्रत्यक्षात रणांगणावर खेळली गेलीच नाही. मात्र या घटनेच्या परिणामी बंगालसारखा समृद्ध प्रांत ब्रिटिशांच्या हाती गेला. त्या वेळचा बंगाल म्हणजे त्यात आजचा बिहारही आला. या भागातील समृद्धीची लूट करून त्या संपत्तीवर इंग्लंडचे उद्योगीकरण रेटले गेले. हा भाग मराठी सत्तेच्या वार्षिक खंडणीचा मुलूख होता. हा हातचा गेल्यामुळे अपरिमित नुकसान झाले. मात्र प्लासी हे मराठी मनाला फारसे खटकत नाही. पानिपत १७६१ ही जखम मात्र आजही ताजी आहे.

हे फक्त भारतापुरतेच खरे आहे असे नाही. इतर अनेक देशांतूनच अशी उदाहरणे पहायला मिळतात.

१९४७ साली फाळणी होऊन स्वातंत्र्य मिळालेल्या भारताला एक मोठा घाव १९६२ च्या अखेरीला सोसावा लागला. सीमायुद्धात चीनकडून आपला दारुण पराभव झाला. काही लहानसहान घटना चीन-भारत सीमेवर १९६२ नंतरही घडत राहिल्या व आजही घडतात. या सोडल्या, तर गेल्या ५३ वर्षांत पुन्हा सीमायुद्ध पेटलेले नाही. मात्र आजही भारतीय मनात १९६२ ची जखम ठसठसते आहे. राजीव गांधींच्या उतावळ्या व असमंजस राजकारणापायी भारताने श्रीलंकेत सैन्य पाठवले आणि पुढे नामुष्की पदरात घेत माघार घेऊन परतावे लागले. श्रीलंकेतल्या या अविवेकी साहसात अनेक भारतीय सैनिकांना प्राण गमवावे लागले. ही संख्या चीनबरोबरच्या लढाईत गमावलेल्या सैनिकांच्या संख्येपेक्षा बहुधा जास्त आहे. मात्र हा प्रसंग लोक विसरले आहेत. १९६२ च्या जखमेवर फक्त खपली धरली आहे; मात्र जखम ओलीच आहे.

आपल्या इतिहासलेखनपरंपरेचा महाराष्ट्राला खूप अभिमान आहे. ती परंपराही मोठी आहे. इंग्रजीत या विषयावर खूप लिखाण झाले आहे. त्यातल्या काही लिखाणाचे मराठी भाषांतरही त्या त्या वेळी प्रसिद्ध झाले. ब्रिगेडीअर जॉन दळवी यांचे मूळ 'हिमालयन ब्लंडर' हे पुस्तक तसेच थोर सेनानी ले. ज. शंकरराव थोरात यांचे आठवणींचे इंग्रजी पुस्तक ही दोन्ही पुस्तके नंतर मराठीत आली. मात्र या विषयाचा सांगोपांग अभ्यास करून मराठीत एक विस्तृत ग्रंथ लिहिण्याचे आव्हान खरेतर महाराष्ट्रातल्या विद्यापीठांच्या इतिहास/संरक्षण विभागांसमोर नेहमीच होते. यासाठी आवश्यक अशी खर्चाची तरतूदही विद्यापीठांकडे उपलब्ध होती. मात्र या शिक्षणसंस्थांनी हे धनुष्य उचलण्याचा प्रयत्न केला नाही.

अशा विषयाला हात घालणा-या अभ्यासकाला

(१) आशिया-युरोपच्या इतिहासातील प्रवाहांचे ज्ञान व भान हवे!

(२) हिमालयीन प्रदेश थोडाफार पायाखालून गेलेला हवा!

(३) संरक्षणव्यवस्था/शस्त्रास्त्रे/आधुनिक युद्धपद्धती, व्यूहात्मक रचना यांची तोंडओळख हवी !

(४) इंग्रजीत या विषयावर झालेले लिखाण अभ्यासलेले हवे.

(५) मराठी भाषेत सहजपणे व प्रवाही पद्धतीने निवेदन

करण्याची शैली हवी. ही यादी आणखीही वाढवता येईल. येथे ठळक बाबींचा उल्लेखच केलेला आहे.

सुदैवाने मेजर जनरल (निवृत्त) श्री. शशिकांत पित्रे यांना या मोठ्या विषयाला हात घालावासा वाटला. संरक्षण, युद्धशास्त्र यांसंबंधी पित्रे गेली अनेक वर्षे लिहीत आहेत. स्वतः चांगले वक्तेही आहेत. त्यामुळे विषयावरील पकड न सोडणारी ओघवती शैली त्यांनी साध्य केली आहे. मेजर जनरल हे भूदलातले ब-याच उच्च दर्जाचे पद आहे. या पदानंतर लेफ्टनंट जनरल व जनरल अशी दोनच पदे भूदलात असतात. जनरल हे सर्वोच्च पद फक्त एकाच व्यक्तीला मिळते. इतके सांगणे पुरे आहे की, सैन्यातल्या एका शाखेवर प्रभुत्व आणि इतर शाखांचा पुरेसा अभ्यास व अनुभव असल्याशिवाय भूदलातील अधिकारी मेजर जनरल या पदांपर्यंत पोचू शकत नाही. तेव्हा '१९६२' या विषयाला एका अनुरूप व्यक्तीने हात घातला, हे चांगले झाले.

या चीन-भारत सीमाप्रकरणाचे धागेदोरे शोधत मागच्या काळात किती मागे जायचे? 'सीमा' म्हणजे नक्की काय? यांसारखे अनेक प्रश्न उपस्थित होतात. भारताच्या उत्तरेला हिमालयाच्या रांगा पूर्व-पश्चिम पसरलेल्या आहेत. या 'हिमालयो नाम नगाधिराजा'च्याही उत्तरेला आशियाचा प्रचंड मोठा पठारी प्रदेश आहे. हिमालयालगत तिबेट, सिकियांग असे भूभाग आहेत. हा मर्यादित भूगोल परिचयाचा आहे. मात्र काटेकोरपणे आखलेली 'सीमा' ही पौर्वात्य संकल्पना नाही. युरोपच्या इतिहासात सुमारे तीन-चारशे वर्षांपासून नकाशावर सीमा निश्चितपणे आखण्याची शिस्त निर्माण झाली. युरोपीय राष्ट्रांनी जेव्हा साम्राज्ये उभारायला सुरुवात केली तेव्हा आशिया, आफ्रिका, दक्षिण अमेरिका यांतील मोठे प्रदेश त्यांच्या आधिपत्याखाली आलेच. या सर्व भागात 'सीमा' ही संकल्पना होती, मात्र ती कागदोपत्री; नकाशावर नव्हे. एखादी नदी किंवा डोंगररांग एवढ्या खुणा पुरेशा होत्या. दोन महाकाय प्रदेशांच्या मध्ये एक पट्टा कुणाच्याच आधिपत्याखाली नाही अशी स्थिती बहुधा असे. याला 'नो मॅन्स लॅण्ड' असे इंग्रजीत नाव आहे. या टप्प्यात माणसे राहात; पण ती टोळीजीवन जगणारी. शेजारच्या दोन्ही शासित प्रदेशांशी त्यांचा संबंध फारच जुजबी असे. एका अर्थाने आधुनिक बफरचे काम ते करीत. हीच परिस्थिती भारताच्या उत्तर सीमेची होती.

इंग्रजांनी टप्प्याटप्प्याने आपली सत्ता भारतभर पसरवली. त्यानंतर त्यांचे लक्ष हिमालयाकडे वळले. नेपाळचा काही भाग त्यांनी नेपाळशी युद्ध करून मिळवला. अफगाणिस्तानाशी त्यांनी सीमा-करार केला. येथील सरहद्द जमिनीवर खांब रोवीत आखली. हे सर्व उद्योग करताना ब्रिटिशांच्या मनात दक्षिणेकडे व पूर्वेकडे विस्तारित गेलेल्या रशियाची चिंता होती.

१९०० व्या शतकात जगात चार मोठ्या सत्ता प्रदेश व्यापत होत्या. तीन आशियात तर एक अमेरिकेत. हिमालयाच्या उत्तरेला जो विशाल भूभाग आहे, त्यात प्रचंड मोठी वाळवंटे आहेत. पामीर हे अत्यंत दुष्कर पठार आहे. सोबत एक कमी पावसाचा पण सुपीक जमिनीचा विशाल पट्टा हंगेरीपासून प्रशांत महासागरापर्यंत पसरलेला आहे. इतिहासकाळात या पट्ट्यात गवत उगवत असे आणि त्यावर गुरे पाळणा-या भटक्या टोळ्या निर्वाह करत. या टोळ्यांतील माणसे काटक व लढाऊ होती. त्यांनी घोडेस्वारी व धनुष्यबाण या विद्यांत प्रावीण्य मिळवले व इ. स. पू. १५०० ते इ. स. १५०० या ३००० वर्षांच्या काळात या सगळ्या प्रदेशात धुमाकूळ घातला. यांचे शेवटचे आक्रमण म्हणजे तुर्क (मोगल) राजा बाबर याने हिंदुस्थानावर १५२६ मध्ये केले, ते. पुढे बंदुका, तोफा, पिस्तुले यांचा शोध लागल्यावर या आक्रमक टोळ्यांचे पराभव झाले. हा प्रदेश शासनाविना रिकामा झाला. त्यामुळे रशियाने या प्रदेशात विस्तार केला व आपल्या अमलाखालील गुन्हेगार, भटके, भूमिहीन अशा लोकांना इथे आणून वसवले. यानंतर रशियाने मॉस्को ते व्हॅलिडिव्होस्टोक हा जगातील सर्वांत जास्त लांबीचा रेल्वे-मार्ग बांधला. चीननेही उत्तर व पश्चिम या दिशांना विस्तार करायला सुरुवात केली. आता भारतातील ब्रिटिश राजवटीला अशी भीती वाटू लागली की, हिंदुकूश ओलांडून रशियाने अफगाणिस्तान जिंकला, तर तिथून हिंदुस्थानवर स्वारी करणे रशियाला अवघड जाणार नाही.

ब्रिटनचे सामर्थ्य नौदलात होते व ते रशियाविरुद्ध वापरता येणे शक्य नव्हते. चीनवर मात्र नौदलाच्या

अनुक्रमणिका

साहाय्याने काबू ठेवणे शक्य होते. म्हणून ब्रिटिशांना रशियाविरुद्ध अधिक काळजीने व्युहरचना करणे गरजेचे होते. यासाठी ब्रिटिशांनी हिंदुस्थानच्या सीमेवर अफगाणिस्तान, काश्मीर अशी बफर राष्ट्रे ठेवली आणि हिंदुस्थान व रशिया यांच्यामधील उरलेल्या भागावर आक्रमण करण्यास चीनला फूस लावली.

या संबंधात लॉर्ड कर्झन याने खालील विचार मांडला होता–

'India is like a fortress with the vast moat of sea on two of her sides and with mountaine for her walls on the remainder! but beyound these walls, which are by no means insuperble height and admit of being penetrated extends glaciers of varying breadth and dimension, we do not want to occupy it, but we can not afford to see it occupied by our allies and friends. But if rivals creep up to it and lodge them selves right under our walls, we are compelled to intervene because a danger would thereby grow up which might menace our security.

He would be a short sighted commander who merely manned his ramparts in India but did not look beyond.'

रशिया-चीन-ब्रिटिश-भारत या विस्तारयोजनेत गुंतत असतानाच्याच काळात युनायटेड स्टेट्स म्हणजे अमेरिका इथेही पूर्वकिनारा व्यापलेली जनता आता पश्चिमेकडे विस्तार करत आजच्या अमेरिकन संघराज्याला आकार देत होती. म्हणून वर चार विस्तारणा-या सत्ता असा उल्लेख केला आहे.

'१९६२' प्रसंगाची ही पार्श्वभूमी आहे. ही सर्व पुस्तकात यायलाच हवी असे नाही. अत्यावश्यक भाग पुस्तकात आलेला आहे.

या '१९६२' प्रकरणाचे काही टप्पे सहजपणे पडतात. १) ब्रिटिश वसाहतकाळ, २) भारतीय स्वातंत्र्य ते चीनने तिबेटात फौज पाठवणे (१९५०), ३) १९५४ चा चीन-भारत करार ते दलाई लामांनी भारतात आश्रयाला येणे (१९५९), ४) १९५९ ते १९ ऑक्टोबर १९६२, ५) २०/१०/६२ ते २०/११/६२, (सीमा युद्ध), ६) युद्धानंतर आत्तापर्यंत.

या सर्व टप्प्यांवर खूप तपशील उपलब्ध आहे. त्याला व्यूहात्मक (strategic), सैनिकी, भौगोलिक, अर्थकारण, आंतरराष्ट्रीय राजकारण, राजनेत्यांची मानसिकता व वागणूक असे अनेक कंगोरे आहेत. अजूनही चीनने फार कागदपत्रे खुली केलेली नाहीत. भारताचे शासन तर कागदपत्रे खुली करण्याच्या संबंधात 'कंजूष' या सदरात उत्तम बसते. निरनिराळ्या सरकारी संस्थांतून एक कार्मीक (personel) विभाग असतो. त्यासंबंधी असे बोलले जाते की, 'काय छान हवा पडलीय!' असे जर या कार्मीक विभागात कुणी म्हणाले तर समोरची व्यक्ती, ही माहिती गुप्त असल्याने, 'सॉरी, मी काही बोलू शकत नाही', असे सांगेल.

'संरक्षणक्षेत्रात एका किरकाळ गोष्टीबद्दल संसदेत प्रश्न विचारला असता संरक्षणमंत्र्यांनी, सदर माहिती अति गुप्त असल्याने उघड करता येत नाही,' असे उत्तर दिले. प्रश्नकर्त्या खासदाराने एका नामांकित नियतकालिकाचा ताजा अंक सभागृहासमोर ठेवला. त्या अंकात सदर 'गुप्त' माहिती छापण्यात आली होती. तरीही संरक्षणमंत्र्यांनी 'माहिती गुप्त आहे' असे ठासून सांगितले.

गोष्ट अशी आहे की, 'सरकारी गुप्त' हे गुप्त राहत नाही. गप्पाटप्पा, परदेशी वरिष्ठ पत्रकार, नाराज कर्मचारी, प्रसारमाध्यमे यांच्यातून गळती सुरू असते. हैदर, टिपूविरुद्धच्या मोहिमेत आर्थर वेल्स्ली (याने पुढे नेपोलियनचा पराभव केला) हा ब्रिटिश सेनाप्रमूख होता. खासगी पत्रात त्याने लिहिले आहे की, 'हिंदुस्थानात बातमी मिळवणे फार सोपे आहे. हिंदी लोक बातम्यांच्या मागावरच असतात आणि गप्पा मारण्याची त्यांना हौस असते. '१९६२' या प्रकरणाचे खूप तपशील उपलब्ध आहेत. मात्र महत्त्वाचे दस्तऐवज अजूनही अधिकृत रीत्या गुप्तच आहेत.

साधारण असे सांगता येईल की, हिंदुस्थानातील ब्रिटिश राजवटीने रशियाच्या विरोधात काही हालचाली केल्या; पण सीमा निर्णायकपणे आखली नाही. चीन

हिंदुस्थानाशी सीमाकरार करण्यास तयारच नव्हता. महायुद्धांच्या काळात (सन १९१४-१८ आणि १९३९-४५) ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानच्या सीमांकडे दुर्लक्ष केले. आणखी एक मुद्दा आहे. डोंगरी क्षेत्रात व्यापारी नफा होण्याची शक्यता नसल्याने व्यापारी ब्रिटिशांना त्यात रस नव्हता. चीन आणि रशिया यांना मात्र 'विस्तार' हा महत्त्वाचा असल्यामुळे ते या डोंगराळ भागातील सीमा आखण्याबाबत दक्ष असत. त्यामुळे अक्साई चीन लडाख वगैरे सीमा अनिर्णित राहिल्या व सीमाभाग रेषेने न दाखवता रंगपट्टा या स्वरूपात दाखवला जात असे. उत्तर प्रदेश- तिबेट सीमेवरदेखील वाद आहे. परंतु तो कमी महत्त्वाचा मानला जातो. हा वादही मिटवायला चीन तयार नाही. लडाखपासून अरुणाचल प्रदेशपर्यंतची सर्व सीमा एकाच करारात ठरवून द्यायची, असा चीनचा इरादा दिसतो. अरुणाचल प्रदेश आणि उत्तरेतर तिबेट यांच्यामधील सीमा इंग्रज सरकारने आपल्या पुरती 'मॅकमोहन रेषा' या नावाने ओढून ठरवली. परंतु या मॅकमोहन रेषेला चीनने मान्यता दिली नाही.

भारत-चीन सीमावादातले हे सारे गुंतागुंतीचे प्रश्न मे. ज. जनरल पित्रे यांनी पुरेशा विस्ताराने या पुस्तकात दिले आहेत.

या पुस्तकाचे एक वैशिष्ट्य म्हणजे त्यात दिलेले नेटके आणि विपुल नकाशे. अनेकदा ऐतिहासिक विषयांवरील पुस्तकांमध्ये नकाशे दिलेले नसतात. तथापि इतिहास समजून घेण्यासाठी नकाशांची अतिशय गरज असते. त्यामुळे लेखक व प्रकाशक यांचे या उत्तम नकाशांबद्दल अभिनंदन केले पाहिजे. मात्र असे सूचवावेसे वाटते की, लडाख व नेफा या भागांचा 'विहंगमावलोकन' असा नकाशा द्यायला हवा होता. होते काय की, नकाशावर अंतर २-३ किलोमीटर दिसते! मात्र रस्ते नसल्यामूळे हे अंतर कापण्यास २४ तासांपेक्षाही जास्त वेळ लागतो. असे का होते हे अशा 'विहंगमावलोकनी' नकाशातून नीट कळले असते.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आणि चीनमध्ये साम्यवादी सरकार आल्यानंतर चीनने तिबेट बळकावला. त्या वेळी भारताने चीनचा निषेधही केला नाही! उलट, ब्रिटिशांचा वारसा म्हणून भारताला चीनमध्ये जे अधिकार मिळाले होते, तेही १९५४ मध्ये केलेल्या करारात भारताने सोडून दिले होते. त्याच वेळी भारत-चीन सीमेबद्दल भारत सरकारने चीनशी वाटाघाटी करून सीमा ठरवून घ्यायला हवी होती. तेही सरकारने केले नाही. पुढे १९५९ साली दलाईलामा भारतात आला व त्याला भारत सरकारने आश्रय दिला. अशा गोष्टी घडतघडत १९६२ चे युद्ध झाले व त्यात भारताचा लाजिरवाणा पराभव झाला. आजही आपल्या मनात त्या पराभवाची चीड व चीनबद्दलची भीती कायम आहे. ही सर्व हकिकत या ग्रंथात योग्य त्या तपशिलांसह आल्याने पुस्तकाला संदर्भ ग्रंथाचे मोल आले आहे.

सीमायुद्धाचे आणि त्यातल्या काही लढ्यांचे समग्र वर्णन लेखकाने नकाशांच्या साहाय्याने केले आहे आणि ते बरेच लांबले आहे. लेखक स्वतः सेनाधिकारी असल्याने त्यात अपुरेपणा किंवा चुका असण्याचा संभव नाही. सामान्य वाचकाला मात्र अशा लांबलेल्या हकिकतीत रस नसतो. मात्र 'शहाणे करून सोडावे सकळ जन' यासाठी असे लिखाण करायला हवे! हळूहळू वाचकांना सवय लागेल.

या पुस्तकातील सुयोग्य गोष्ट म्हणजे लढायांमध्ये हुतात्मा झालेल्या शूर वीरांचे पुष्कळ फोटो छापले असून त्यांना श्रद्धांजली वाहिली आहे. हे करणे आवश्यकच होते.

मराठीतल्या पहिल्याच व खूप मेहनत करून लिहिलेल्या या ग्रंथात काही खुपणा-या त्रुटी आहेत. त्या नसत्या, तर बरे झाले असते. तथापि मनुष्याने केलेल्या कोणत्याही गोष्टीत काहीतरी उणे राहतेच. त्यामुळे ग्रंथाचे महत्त्व कमी होत नाही. अशा त्रुटींची काही उदाहरणे खाली देत आहोत.

१) पुस्तकाच्या पान ४ वर असे विधान आहे. 'व्हायचे तेच झाले. २० नोव्हेंबर १९६२ ला, नेफामधील कामेंग आणि लोहीत डिव्हिजन्समध्ये थोरातांनी मोडी भाष्य केलेल्या तंतोतंत मार्गांकरवी चिनी सैन्याने आक्रमण केले. २० नोव्हेंबर १९६२ ही चीनने एकतर्फी युद्धविरामाची घोषणा केल्याची तारीख आहे. आक्रमण झाले २० ऑक्टोबर १९६२ रोजी. २० नोव्हेंबर अक्षरी असल्याने येथे छपाईची चूक ही मानता येणे शक्य नाही. लेखक व

अनुक्रमणिका

संपादक दोघांच्याही नजरेतून ही चूक कशी निसटली, हा प्रश्नच आहे.

२) दिनांक ७ नोव्हेंबर १९५० रोजी (चीनने तिबेट काबीज केल्यावर) सरदार पटेलांनी प्रधानमंत्री नेहरू यांना एक सविस्तर पत्र लिहिले होते. ज्येष्ठ पत्रकार दुर्गादास यांनी स्वतःच्या 'इंडिया - फ्रॉम कर्झन टू नेहरू ॲण्ड आफ्टर' या ग्रंथात परिशिष्ट म्हणून ते छापले. या पत्राचा खूप मुद्देसूद सारांश लेखकाने नोंदला आहे. मात्र पत्रावर भाष्य करताना एक महत्त्वाचा भाग दुर्लक्षित राहिला आहे. तो असाः

These are some of the questions which occur to my mind. It is possible that a consideration of these matters may lead us in to wider questions of our relationship with China, Russia, America, Britain and Burma:..' संरक्षण क्षेत्राचा थोडाफार अभ्यास असणा-यांना पत्राचा मसुदा सर गिरिजाशंकर वाजपेयी यांचा आहे, हे माहीत आहे. सर गिरिजा हे आय. सी. एस. श्रेणीत खूप वरिष्ठ अधिकारी होते व परराष्ट्र-धोरणाचे उत्कृष्ट जाणकार होते. दुस-या महायुद्धाच्या काळात ते वॉशिंग्टन येथे हिंदुस्थान- अमेरिका यांच्या संबंधातील बाबी हाताळणा-या कार्यालयाचे प्रमुख होते. सरदारांचे मूलभूत धोरणाबाबत नेहरूंशी तीव्र मतभेद होते. अमेरिकेविषयी व आय. सी. एस. अधिका-यां-विषयी नेहरूंच्या मनात एक अढी होती.' 'भांडवलशाही' हे तात्त्विक कारण आणि कृष्ण मेनन यांनी घातलेले खतपाणी त्यामुळे 'तिबेट' या प्रश्नाचा फायदा घेत आपले सर्व धोरण (समाजवाद, चीन रशियाकडे झुकलेला कल वगैरे) मुळातूनच बदलण्याचा प्रयत्न काँग्रेसमधील एक गट नोकरशाहीच्या साहाय्याने करत आहे, असा निष्कर्ष नेहरूंनी काढला, असे मानायला वाव आहे.

कोरियन युद्धाच्या वेळी पाकिस्तानने नाममात्र सहभाग देत भरपूर आधुनिक शस्त्रास्त्रे फुकटात पदरात पाडून घेतली. भारतानेदेखील एक वा दोन पलटणी पाठवून भरपूर अत्याधुनिक शस्त्रे मिळवून संरक्षण- सिद्धता वाढविण्याची संधी साधावी असा, एक मत- प्रवाह होता. पण फक्त रूग्णवाहिकापथक पाठवणे मान्य करून नेहरूंनी ही संधी गमावली अशी, आठवण काकासाहेब गाडगिळांनी 'लाल किल्ल्याच्या छायेत' या पुस्तकात दिली आहे.

व्यूहात्मक धोरणाबद्दलची ही पार्श्वभूमी व त्याच्या पडसादांची चर्चा या महत्त्वाच्या ग्रंथात हवी होती, असे वाटते.

अमेरिकेबाबत नेहरूंच्या अढीचे एक उदाहरण नेहरूंचे विश्वासू श्री. गणदेविया यांनी दिले आहे. १९४९ साली नेहरूंनी अमेरिकेला पहिली भेट दिली. त्याआधी अमेरिकेकडून धान्यपुरवठा व्हावा या संबंधात वाटाघाटी चालू होत्या. मात्र त्या पुढे सरकत नव्हत्या. त्या संबंधात अन्न मंत्रालयाकडून एक टिपण आले. त्यात म्हटले होते की, 'अमेरिकेच्या अध्यक्षांबरोबर बोलणी करताना नेहरूंनी अध्यक्षांना विनंती करावी की, धान्य- पुरवठ्याचा करार लवकर व्हावा.' टिपणातील हा मुद्दा वाचताच नेहरू रागावले आणि 'मी काय तिथे भिकेची झोळी घेऊन जाऊ काय?' असे ते मूठ आवळून जोराने म्हणाले. त्यांनी त्या मुद्द्यावर काट मारली. खरेतर मागणी आधीच झाली होती आणि देशात अन्नाची हाकाहाक होती. अशा वेळी देशाच्या नेत्याने वाटाघाटींना वेग यावा, एवढीच विनंती करायची होती. यात वावगे काय होते? नेहरूंच्या रागाच्या स्फोटामागे त्यांचा अहंकार किती व अमेरिकेबद्दल अढी किती, याचा विचार करता येईल. मात्र सर गिरिजा आणि सरदार पटेल भूव्यूहात्मक बदल सुचवीत होते. या संदर्भात (strategic) बदल म्हणजे काय, आणि डावपेचात्मक (tactical) उपाय म्हणजे काय, यांतील फरकाची चर्चा करायला हवी होती.

३) पुस्तकात 'कवचित' असा शब्द वापरला आहे. 'आर्मर्ड' या इंग्रजी शब्दाला हा प्रतिशब्द. संरक्षणक्षेत्रातले बरेच शब्द इंग्रजीत असतात. कारण पाश्चात्त्यांनी संरक्षणाचे जे शास्त्र व तंत्र विकसित केले, त्यात ते शब्द तयार झाले. आपण मराठीतही ब-याच ठिकाणी इंग्रजी शब्दच वापरतो. पण काही ठिकाणी आपण अर्थवाही मराठी शब्द तयार केले व रूळलेही. उदा., 'टँक' या शब्दाला 'रणगाडा' हा शब्द रूढ झाला. 'कवच' हा शब्द महाभारतातही आहे व त्यावरून 'कवचित' (म्हणजे कवचाने आच्छादिलेला) असे रूप तयार होते.

मात्र 'आर्मर्ड' या शब्दाला 'चिलखती' हा शब्द खूप काळ रूढ आहे. तेव्हा तो सोडून 'कवचित' हा निराळा व रूढ नसलेला शब्द वापरण्याची जरूर नव्हती.

तथापि संरक्षणशास्त्राविषयी लिहिताना भासणारी एक गरज नोंदवायला हवी. एकतर मूळ इंग्रजी शब्द जसेच्या तसे वापरावेत किंवा सोपे, रुळतील असे प्रतिशब्द तयार करावेत. परंतु मूळ इंग्रजी शब्द वापरायचे झाल्यास त्या शब्दांना अभिप्रेत असणारी वस्तू मराठीत वर्णन करून सांगावी लागेल व ते काहीसे विचित्र होईल. तेव्हा मे. ज. पित्रे. यांनी पुण्यात भाषातज्ज्ञ, इतिहाससंशोधक व संरक्षण दलातील निवृत्त मराठी अधिकारी यांच्या साहाय्याने अशा तांत्रिक शब्दांना योग्य असे प्रतिशब्द तयार करावेत.

४) ले. ज. थोरात यांच्या आत्मचरित्रात नेहरूंशी झालेल्या संभाषणातील 'You Maharastrians are like mules' असे नेहरूंनी उच्चारलेले वाक्य दिलेले आहे. लेखकांनी त्याचे भाषांतर करताना 'mules' या शब्दासाठी 'खेचर' हा शब्द वापरला आहे. मात्र नेहरूंना अभिप्रेत असलेला भावार्थ कळण्यासाठी मराठीत 'आडेल तट्टू' चपखल शब्द आहे.

५) थोरात व नेहरू यांच्या भेटीत थोरातांनी १९५९ साली पाठविलेले व भूदलप्रमुख जनरल थिमय्या यांनी अनुकूल अभिप्राय देऊन संरक्षण मंत्र्यांकडे पाठविलेली 'त्रिस्तरीय' योजना आपल्यापर्यंत पोचलीच नाही, असे नेहरू रागावून म्हणाले, असा उल्लेख आहे. हा उल्लेख कितपत विश्वसनीय आहे, हा प्रश्नच आहे.

नोव्हेंबर १९६२ मध्ये सीमायुद्ध चालू असताना नेहरूंचे लोकसभेत एक भाषण झाले. तेव्हा नेहरूंनी सांगितले की, थोडीथोडी माघार घेत चिनी सैन्याला आत घुसू द्यावे आणि मग अनुकूल ठिकाणी भारतीय सैन्याने त्यांना जबरदस्त उत्तर द्यावे, अशी योजना सुचवली गेली होती. पण नेहरू पुढे म्हणाले की, अशी माघार घेणे भारतीय जनतेला पटले नसते. ही हकिकत 'Six Thousand Days' या पुस्तकात दिली आहे.

१९६७ साली कृष्ण मेनन यांनीही एका मुलाखतीत हेच कारण थोरातांची योजना न स्वीकारण्याचे दिलेले आहे. त्यावरून असे वाटते की, थोरातांची संपूर्ण योजना नेहरूंपुढे न ठेवता त्याची रूपरेषा नेहरूंना सांगितली गेली असेल. असे काही झाले नसेल, तर थोरातांची डिसेंबर १९६२ मध्ये भेट होण्यापुर्वी नेहरूंनी केलेल्या भाषणाचा उलगडा होत नाही.

६) पुस्तकात प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी संदर्भ दिले आहेत. मात्र पुस्तकाच्या शेवटी सर्व संदर्भ साहित्याची यादी दिलेली असते; ती येथे नाही. तसेच व्यक्ती व स्थलसूची याही नाहीत. ही महत्त्वाची उणीवच आहे. तसेच नेव्हिल मॅक्सवेलच्या 'इंडियाज चायना वॉर' या पुस्तकाचे नाव अनेक ठिकाणी 'द इंडियाज चायना वॉर' असे चुकीचे छापले आहे.

७) 'हिंडसन-ब्रुकर्स समिती'चा अहवाल आजही 'गुप्त'च आहे. मात्र तो नेव्हिल मॅक्सवेल यांना उपलब्ध होता. हे गुपित गेली अनेक दशके जाणकारांना माहीत आहे. अलीकडे मॅक्सवेल यांनी या अहवालातील काही पाने त्यांच्या वेबसाइटवर प्रसिद्ध केली. पण मॅक्सवेल यांनी पुस्तकात जे म्हटले होते, त्यापेक्षा नवीन असे या पानांतून काहीच हाती लागत नाही.

८) पुस्तकात एके ठिकाणी भारतातला 'सखल' प्रदेश असा शब्द वापरला आहे. हिमालयाच्या तुलनेत भारतातला कोणताही प्रदेश (अगदी सह्याद्रीसुद्धा) सखलच म्हणावा लागेल, इथे 'मैदानी' असा रूढ शब्द वापरला असता. तर हा गैरसमज झाला नसता. 'द ग्रेट गेम' याला लेखकाने 'महाद्वंद्व' असे म्हटले आहे; पण 'द्वंद्व' म्हणावे असे काहीच घडलेच नाही. तत्कालीन सौव्हिएट युनियनच्या परराष्ट्र मंत्र्याने या युद्धाला 'टुर्नामेंट ऑफ शाडोज' म्हणजे 'हा खेळ सावल्यांचा' असे संबोधले होते, ते यथार्थ आहे.

९) पुस्तकाचे नाव 'न सांगण्याजोगी गोष्ट' असे आहे. नाव ठेवण्याचा अधिकार लेखकाला नक्कीच आहे. तथापि मतभेद व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य वाचकाला असते. राष्ट्राच्या इतिहासात 'जय' नावाचे इतिहास घडतात. त्यांच्या गाथा गायल्याही जातात. पराभवाच्या आठवणी कटू असतात म्हणून पार्श्वभूमी, कारणे यांच्यासह त्या पराभवाच्या गोष्टी वारंवार सांगाव्या लागतात. गझनीचा महमद इतके अंतर ओलांडून सोमनाथापर्यंत कसा पोचला? उत्तरेतल्या 'कारा' या गावचा सुभेदार, अल्लाउद्दीन खलजी

देवगिरीला पोचेपर्यंत यादवांचे राज्य गाफील कसे राहिले? पानिपतला १७६१ साली पराभव का झाला? आंग्र्यांचे आरमार इंग्रजांच्या मदतीने नष्ट करून स्वराज्याचा कोणता फायदा नानासाहेब पेशव्याने साधला? अशा प्रश्नांची चर्चा पुराव्यांच्या आधारे समाजात नेहमीच होत राहिली पाहिजे.

सीमायुद्धाच्या बाबतीत अशीच चर्चा मुद्देसूद, सप्रमाण, योग्य नकाशासह ओघवत्या भाषेत मे. ज. शशिकांत पित्रे यांनी या पुस्तकात केली आहे. मराठीत तरी अशी चर्चा यापूर्वी झाली नाही. हे आवाहन समर्थपणे हाताळल्याबद्दल लेखकांना धन्यवाद.

पुस्तकाची छपाई व इतर निर्मितिमूल्ये प्रकाशन संस्थेच्या लौकिकास साजेशी आहेत.

**न सांगण्याजोगी गोष्ट**
मे. ज. शशिकांत पित्रे
राजहंस प्रकाशन,
पाने ४०१,
किंमत रु. ३७५/-

***



अनुक्रमणिका

# इस्लामची प्रथा व आधुनिकता*

एस. अलम खुन्मिरी

(हा लेख इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम् या संस्थेने हैदराबाद येथे फेब्रुवारी १९६६ मध्ये भरविलेल्या परिसंवादात मांडला होता; परिसंवादाचा विषय होता - इस्लामची प्रथा व आधुनिकता.)

सर्व उच्च धर्मांप्रमाणेच इस्लाममधेही एक मूलभूत दृष्टी व सिद्धान्तांची व्यवस्था आहे आणि ही सिद्धान्तव्यवस्था त्याच्या इतिहासात ह्या दृष्टीच्या केन्द्राभोवती झाली आहे. नियमव्यवस्था (Law) आणि मूलभूत तत्त्वदृष्टी (Vision) यांच्यात एकरूपता असल्यामुळे जगातील उच्च धर्मांमध्ये इस्लामला बहुधा असाधारण स्थान प्राप्त झाले आहे. पवित्र ग्रंथ हा नियमव्यवस्था व तत्त्वदृष्टी यांचा आधार होय. ज्यांना ईश्वराचे भय आहे त्यांना निश्चित मार्गदर्शन मिळते, असा या ग्रंथाचा दावा आहे. हा ग्रंथ ईश्वरवाणी आहे व ग्रंथाच्या सर्व भागांना समान प्रामाण्य आहे. मुसलमानास ईश्वराचे अस्तित्व जितके मूलभूत, तितकीच ईश्वरी वाणीवरील श्रद्धा ही मूलभूत होय. या ग्रंथातील मुलाच्या दायभागाचा नियम असो वा अंतिम निर्णयदिनाचे भविष्य असो, सर्वच सारखे अबाध्य आहे. या दोन प्रकारच्या आविष्करणांमध्ये किंवा सिद्धान्तांमध्ये तथ्याचे तारतम्य ठरविण्याचा अधिकार कोणाही अनुयायाला नाही. रूढ देवताज्ञानाची मांडणी अशा प्रकारे झाली आहे की, त्यामुळे इस्लामच्या सिद्धान्तरचनेत प्रेषिताच्या ऐवजी ग्रंथाला केंद्रस्थान प्राप्त झाले आहे. या त्याच्या स्वीय गुणामुळे इस्लामच्या जगात नियमव्यवस्थेला वास्तविकता प्राप्त झाली.

**इस्लाम ही राजकीय शक्ती**

तत्त्वदृष्टी (Vision) व नियमव्यवस्था (Law) यांच्या समान प्रामाण्यामुळे इस्लाम विशिष्ट प्रकारचा धर्म बनला आणि प्रेषित हा स्वतः मदिनेच्या गणराज्याचा सार्वभौम नियंता बनून त्याने स्वतःच्या कारकिर्दीतच ती नियमव्यवस्था लादली व कार्यवाहीत आणली. यामुळे भावी पिढ्यांमध्ये एक गुंतागुंतीची परिस्थिती निर्माण झाली. माणसाचे आध्यात्मिक परिवर्तन करण्याकरिता दिलेला संदेश म्हणजे मक्काचा इस्लाम झाला, तर मदिनेचा इस्लाम हा जिवंत राजकीय शक्ती बनला आणि नव्या राज्याचा धर्मही बनला. प्रेषिताच्या मरणानंतर ते राज्य ढासळले नाही; तर उलट, पहिल्या वीस वर्षांत विस्तारले. त्यामुळे परंपरेला व प्रेषिताच्या जीवनाला महत्त्व प्राप्त झाले. प्रेषिताच्या सहका-यांवर राज्यकारभार सोपविला व त्यांनी प्रेषिताच्या व्यवहारापासून मार्गदर्शन मिळविले. प्रेषिताच्या व्यवहाराला म्हणजे सुन्नाला कुराणाच्या खालोखाल स्थान प्राप्त झाले व हळूहळू कुराण व सुन्ना यांचा दर्जा समान बनला. कुराण व सुन्ना यांच्याबरोबर खलाफा म्हणजे सहका-याचा व्यवहार हे तिसरे महत्त्वाचे तत्त्व स्वीकारले जाऊ लागले. इस्लामी परंपरा म्हणून ज्याला आपण म्हणतो, त्याचे मूळ असे ऐतिहासिक विकासात आहे.

**इस्लाम प्रथम गतिशील व नंतर अगतिक**

विस्ताराच्या पहिल्या पर्वात देवताज्ञानाचे प्रश्न क्वचितच चर्चिले जात; परंतु जेव्हा उत्साहाचा पहिला भर ओसरला आणि समृद्धीच्या कालखंडास प्रारंभ झाला, तेव्हा व्यवहारी कायदेशीर वादांची बरोबरी देवताज्ञानाच्या चर्चांनी मिळविली. कायद्याचे संहितीकरण झाल्याबरोबर मुस्लिम जगातील उत्कृष्ट मने तत्त्वज्ञान व देवताज्ञानसंबंधी आकर्षक प्रश्नांकडे आकृष्ट झाली. इस्लामच्या ५ व्या शतकाच्या सुमारास जेव्हा इस्लामच्या सांस्कृतिक परिसरात अल घझालीचा उदय झाला, तेव्हा इस्लामी पुराणमतवाद पक्का रुजला गेला. अल घझालीने पुराणमतवादाला तात्त्विक अधिष्ठान दिले व 'गूढमार्ग' आणि 'पुराणनिष्ठ देवताज्ञानमार्ग' यांच्यांतील अंतर भरून काढले. जेव्हा इस्लामी संस्कृतीच्या सुवर्णयुगाच्या समाप्तीचा समय जवळ आला आणि तत्त्ववेत्ते व विज्ञानविशारद यांचे युग संपले, तेव्हा इतिहासाने घझालीची

***नवभारत** ऑगस्ट १९६६ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत.

अनुक्रमणिका

